❐ **पहिली आवृत्ती :**
१५/१०/२००६

❐ **मुखपृष्ठ :**
दिलेश हजारे

❐ **प्रकाशक :**
शारदा ग्रंथ प्रसारक मंडळ,
खडपाबांध, फोंडा - गोवा.

❐ **किमंत :** ५० रुपये

❐ **प्रति,** १,०००

अभिषेकी घराण्याचा पेटीवादन, ज्योतिष, लेखन व समाजसेवा या गुणांचा वारसा जिच्याकडून मिळाला त्या माझ्या **कै. आईला** तसेंच जोशी घराण्यातील बौध्दीक संपन्नता ज्यांच्याकडून मिळाली त्या माझ्या **वडिलांना**.

# पहिले पाऊल मोलाचे !

सौ. रेखा दत्तात्रय उपाध्ये यांचा पहिला कथासंग्रह "~~[illegible]~~ जागृति" या नावांने प्रसिध्द होतो आहे. याबद्दल त्यांचे मनःपूर्वक अभिनंदन.

एखादे लहान मूल स्वतःच्या पायांवर उभे राहाते व काही दिवसांनी कुणाचा आधार न घेता चालू लागते, त्यावेळी जो आनंद त्या मुलाच्या संपूर्ण परिवाराला होतो तसाच आनंद मला या सर्व स्तरांवर, धडपडून, कांही व्यक्त करण्याचा प्रयत्न करणाऱ्या स्त्रियांना भेटतानांही होतो.

सावंतवाडीतल्या 'आरोंदा' या छोट्याशा गावांत जन्म व शिक्षणही बेताचेच. विवाहानंतरचा सर्व काळ मात्र गोव्यांतच गेला आहे. कोकण, गोवा अशा निसर्गरम्य परिसरांत वावरणाऱ्या स्त्री चे मन स्वाभाविकपणेच संवेदनाशील बनतेः तसं पाहिलं तर स्त्री ही जात्याच भावूक व संवेदनशील असते. पण ते भावूक मन नंतरच्या वाटचालीत हरवून जाते. बऱ्यांच जणींचा जगण्याचा उत्साहच मावळलेला आढळतो. त्यांच्या मध्ये अनेक सुप्त गुण असतात; पण त्यांच्याकडे वळून बघण्यासाठी प्रयत्न त्या करत नाहीत. त्याचा परिणाम बऱ्यांच जणींना लाभलेले दैवदत्त असे लेखन, गायन, वादन, काव्य, अभिनय हे सर्व गुण आंतल्या आंत कोमेजून जातात. ते गुण कोमेजतात तसेच अनेकजणींचे व्यक्तिगत जीवनही निराशावादी बनलेले पाहिले की मला खूप वाईट वाटते. अशा वेळी रेखा उपाध्ये नावांची कुणी स्त्री प्राथमिक शिक्षिका म्हणून १९६८ साली गोव्यांत काम करू लागते. आपल्या शिक्षिकेच्या रूपांस व्यवस्थित न्याय देते. मुलांसाठी पाठ्यपुस्तके निर्मितीत सहभागी होते. मुलांसाठी राबविण्याचा निसर्गाचा अभ्यासक्रम त्यांच्या पर्यंत नीट पोंचवते; इतकेच नव्हे तर पेटीवादन व ज्योतिष शास्त्राचा स्वतःहून अभ्यास करते. शिक्षकी जीवनांत त्या रमल्या असताना, कौटुंबिक अडचणीसाठी त्यांनी स्वेच्छानिवृत्ती घेतली. हा त्यांचा जीवनपट खरोखरच कौतूकास्पद आहे. या साऱ्या वाटचालीत त्यांची अवलोकन शक्ती व त्यांवर विचार करण्याची त्यांची सवय टिकवून ठेवली आहे हे विशेष !

आपल्या सभोवताली अनेक घटना घडताना आपण बघत असतो. त्यावेळी अनेक विचार आपल्या मनांत येतात. ''हे असे व्हायला हवे होते; तसे होऊ शकले असते. असे का होऊ नये?''

असे प्रश्न त्या त्यावेळी आपल्या मनांत येतातही. पण आपण त्यांवर भाष्य करत नाही. रेखाबाई मात्र असे अनेक प्रसंग टिपतात; आणि त्यांवर लेखन करतात. त्या लेखाला लेखाचे स्वरूप न देता, त्यां विषयांना कथेचे स्वरूप देण्याचा त्या प्रयत्न करतात. त्या प्रयत्नांतूनच त्यांचा ''**जागृति**'' हा पहिला कथासंग्रह आज प्रकाशित होतो आहे.

'भूषण' या कथेत त्या कचरा समस्या मांडतात; पण त्यांवर तरूण पिढीचे या समस्ये बाबत कसें क्रियाशील असावे हे त्या मांडतात. किंवा 'परिवर्तन' कथेचा नायक 'सदू' हा काही काम न करता लोकांच्या कुळागारामधले नारळ, सुपाऱ्या चोरण्याचा व पैसे कमावण्याच्या वेडनि वाया गेलेला एक मुलगा; पण वाड्यावरचे सर्व लोकच त्याला शहाणा करून चांगल्या मार्गावर पोंचवतात; तीच कथा 'कृतज्ञता' कथेतील वाया गेलेल्या गंगारामची आहे. वाईट मुलांच्या संगतीने तो चोऱ्या, दरोडे घालण्याइतका बिघडलां, पण एक वर्ष तुरूंगात राहून आल्यावर त्याला आपली चूक समजते व तो चांगला माणूस बनतो. त्यांच्या कथेतील 'गांव' गांवच्या अंजलीचा सासरी होणाया छळ बघून तिची रीतसर सुटका करून तिचा विवाह एका चांगल्या युवकाशी लावून देतो. यावरून समाजच जर एकत्रितपणें उभा राहिला तर खूप काही चांगले घडू शकते हा विचार लेखिका मांडते आहे. वास्तवांत त्या सर्व घटना प्रत्यक्षांत पाहिल्यावर त्यावरचे जें उपाय लेखिकेच्या मनांत येतात. ते कथेच्या माध्यमातून व्यक्त होत जातात.

बेवारशी कथेत चादरी विक्रेत्या तरूणांचे बेवारशी जीवत जसे मांडलेय - तसेच 'त्रिकुट' कथेत शालेय मुलांची मैत्री आणि प्राण घातक अपघातांतही ती मैत्री तुटू शकत नाही याचे कारण निष्पाप मैत्री व त्या मुलांचे निरागस मन ! असे कथा सूचित करते.

'सत्यवानाची सावित्री' ही आधुनिक काळांतल्या आदर्श पतीचे चित्र जसे

मांडते तसेच "माय मरो" या कथेत मुलांच्या मनांत आई इतकेच मावशींचे स्थान किती श्रेष्ठ आहे हे मांडताना आईचा मृतदेह पाहूनही न रडणारा छोटा मुलगा मात्र मावशी येताच कसा रडतो ही घटना आली आहे. 'आंब्याची वर्फी' ही कथा विनोदी ढंगाने मांडण्याचा प्रयत्न केला आहे.

असा हा चौदा कथांचा रेखा उपाध्ये यांचा कथा संग्रह "**जागृति**".

मी त्या साऱ्या कथा वाचल्या तेव्हा एक गोष्ट जाणवली की लेखिकेच्या अवलोकनातून तिला अनेक सशक्त कथाबीजे सांपडतात - पण कथा फुलविण्यांत ती खूपच कमी पडली आहे. पूर्वी आजी अंगणात बसून मुलांना कथा सांगत असे. प्रत्येक कथेला एक तात्पर्य असे. पण ते सूत्र सांगताना आजी असे रंगवून सांगत असे की रात्र झाली तरी मुले अंगणातच खिळून बसत. कथा नुसती सांगणे, किंवा लिहीणे यापेक्षा ती रंगवून सांगणे किंवा लिहीणे यांत खरे कसब असते. त्यासाठी प्रथम भाषा समृध्द हवी. शब्दसंपत्ती हवी व त्यांसाठी भरपूर वाचन हवे जिथे आजची नवीन लेखिका खूपच कमी पडतेय. गृहिणी, शिक्षिका, पत्नी, सून, माता शिवाय एक नागरिक अशा विविध भूमिका निभावताना 'वाचन' कधी? हा प्रश्न खरोखर गहन प्रश्न तर आहेच.. पण जिला लेखिका व्हायचे आहे तिथेच हा प्रश्न सोडवायचा आहे. आपल्यासाठी वेळ आपला आपणच शोधायचा आहे याचे कारण भाषा व शब्दसौंदर्य हा कथेचा आत्मा आहे. विशेषतः स्त्री ची कथा ही भाषेने संपन्न हवी.

सौ. रेखा उपाध्ये यांचा हा पहिला कथासंग्रह आहे. या पहिल्या संग्रहातूं मला विश्वास आहे की त्यांच्या यानंतर येणाऱ्या कथा या अधिक सुंदर आणि मनोवेधक असणार आहेत. आपले सर्व व्याप सांभाळून धडपडणाऱ्या, साहित्य गुण जपणाऱ्या गोमंतकीय लेखिकांच्या पंक्तीत आज सौ. रेखा उपाध्ये यांचे नांव नव्याने दाखल झालेय. त्यांचे मनःपूर्वक अभिनंदन व सर्व शुभेच्छा !

**- माधवी देसाई.**

# गोष्टींची क्रमवारी

# १. सत्यवानाची सावित्री

सावित्रीने आज लवकरच स्वयंपाक आटोपला आणि ती दुपारीच झोपी गेली सत्यवान कामावरून आला. त्याने स्वयंपाक घरात डोकावले बाथरुमात जाऊन पाहिले पण सावित्रीचा पत्ता नव्हता. बेडरूममध्ये जाण्यासाठी तो वळला. एवढ्यात सावित्रीच्या खोकण्याचा आवाज त्याला आला. त्याने आहे तेथूनच सावित्रीला हाक दिली. सावित्री लगबगीने बाहेर आली. तिने हातानेच केस नीट केले. पदर सावरला आणि ती जेवणाच्या टेबलाकडे आली. तिची उडालेली धांदल सत्यवानाच्या नजरेतून सुटली नाही. "काय ग, आज दुपारीच शी झोपलीस? परत आलेला खोकला चालू ठेवतच सावित्री म्हणाली, "आज मला सकाळपासूनच कससेच होतय म्हणून स्वयंपाक लवकर करून मी झोपले.

हा असा क्रम कित्येक दिवस चालूच राहिला. सर्दी खोकल्याचा ससेमिरा काही सुटत नव्हता. जवळच्या डॉक्टरकडे जायचे, औषध घ्यायचे असा पहिल्या पहिल्यांदा महिना गुजरायचा पण आता ते प्रमाण आठवड्यावर आले होते. निरोगी सावित्री औषधाला कंटाळली होती.

आज मात्र सावित्रीच्या सर्दीने पुढचे पाऊल टाकले. अंगात सडकून ताप भरल्याने सावित्री उठलीच नाही. न्याहारी, जेवण तयार करून सत्यवान ऑफीसला जायला निघाला. जाता जाता शयन कक्षात जाऊन सावित्रीची चौकशी करायला तो विसरला नाही. सावित्री तापाने बेभान होऊन बडबडत होती. तावडतोब ऑफीसला फोन करून त्याने आपली रजा टाकण्यास सांगितले. लगेचच तो डॉक्टरकडे गेला व त्यांना घरी आणले. डॉक्टरनी सर्दीसाठी व ताप उतरण्यासाठी औषधे दिली.

चार दिवस तापाने सावित्रीची साथ सोडली नाही. कधीही स्वयंपाकाचे न पहाणाऱ्या सत्यवानाला सावित्रीचे आजारपण बरेच महागात पडले. कधी भाजीत मीठ नाही तर कधी आमटीत आंबट नाही असे प्रकार व्हायचे. चपाती शिवाय जेवण न चालणाऱ्या सत्यवानाला वेळ निभावून नेण्याची पाळी यायची. पुन्हा

सावित्रीसाठी कांजी, पेज हे वेगळे पदार्थही त्याला करायला लागायचे. पण न कंटाळता सत्यवान आपली ज़बाबदारी पार पाडत होता. कर्तव्य भावनेनेच नव्हे तर मायेच्या ओलाव्याचीही त्यात भर होती.

आज सावित्रीचा ताप पूर्णपणे गेला. उद्यापासून कामावर जायचा निश्चय करून सत्यवान सावित्री शेजारीच लवंडला. कित्येक रात्री जागरणात गेल्याने त्याचा लगेचच डोळा लागला. सावित्रीला आज झोप येत नव्हती. सत्यवानाच्या डोक्यावरून ती हात फिरवत होती. गेले चार दिवस आपली सेवा करणाऱ्या सत्यवानाला कोणत्या प्रकारे दुवा देऊ हे तिच्या ध्यानात येत नव्हते.

सकाळी सकाळीच सत्यवानाला जाग आली. सावित्रीने तिचे तोंड कुखाळले व डबडबलेल्या डोळ्यांनी ती त्याच्याकडे पहातच राहिली. डोळ्यातील अश्रू डोळ्यात सामावले नाही. ते टपकन् गालावर ओघळले. सावित्रीला जवळ ओढत सत्यवान म्हणाला, ''काय झालं माझ्या राणींचं? आज उठल्या उठल्याच हे नाटक?

त्यावर काही न बोलता सावित्री उठली. तिने सत्यवानाला आवडणारा आल्याचा चहा केला आणि खालूनच त्याला साद दिला. आज चार दिवसानंतरचा सावित्रीच्या हातचा चहा प्यावा म्हणून फक्त चूळा भरूनच सत्यवान आला. दोघानीही चहा एकमेकांच्या सानिध्यात चव घेत घेत पिऊन टाकला.

''सावित्री, आज चांगले जेवण कर हं ! मेथीची कांदा घालून भाजी, फोडणीचे वरण आणि भेंडीची कोशंबीर!'' सत्यवानने एका दमात सांगितले. पण सावित्री आजारातून उठल्याचे ध्यानात येताच त्याने जीभ चावली व म्हणाला, ''नको सावित्री - फक्कडशी खिचडीच कर ना म्हणजे भाजी आमटीचा सवाल मिटेल आणि तुझीही दगदग वाचेल. सावित्रीने बळेबळेच स्मितहास्य केले आणि ती खिचडीच्या तयारीला लागली.

दुपारी सत्यवान आला त्यावेळी सावित्री स्वयंपाक घरात नव्हती. तो धावतच शयनगृहाकडे गेला. सावित्री जोरजोराने कण्हत होती. पुन्हा डॉक्टरला आणण्यात आले. औषधांच्या डोसाची मात्रा वाढवण्यात आली. ताप दोन दिवसापुरता हद्दपार

झाला. परत परत सर्दी आणि ताप यामुळे सावित्री खंगून गेली होती. आजाराचे खरे कारण आजपावेतो उघड झाले नाही. सर्दी तापाचीऔषधं चालेनाशी झाली शेवटी डॉक्टरनी शहरातील एका स्त्री रोग तज्ञाकडे तिची पाठवणी केली.

तपासणी झाल्यावर डॉक्टरनी तिला अनेक प्रश्न विचारले. अंगावरून जात असल्याचे तिने स्पष्ट केले. स्त्री डॉक्टर असल्याने सावित्री संकोचली नाही. त्यानंतर सर्व तपासण्या झाल्या. सावित्रीला गर्भाशयाचा कॅन्सर झाल्याचे निदर्शनास आले. दुखणे अंगावर काढल्याने रोग पुढच्या पायरीपर्यंत पोचला होता. शेवटचे उपाय फक्त रोग्याला आराम वाटणे व आयुष्य लांबवणे या उद्देशाने चालले होते. दिवसें - दिवस खंगणारी सावित्री पाहून सत्यवान पूर्णतः हबकून गेला होता.

या हॉस्पिटलपेक्षा आणखी चांगल्या हॉस्पिटलकडे न्यायचा विचार पक्का झाला. इतर जनांसमवेत त्याच्या भावानेही त्याला सल्ला दिला आणि सावित्रीला नामांकित रुग्णालयात हलवण्यात आले. तेथे अमेरिकेकडून येणाऱ्या डॉक्टरकडून तपासणी करून घ्यायची होती. गुरूवारी सदरील तपासणी झाली. रोगाने हद्द ओलांडल्याने इलाज प्रभावी ठरत नव्हते. रामबाण उपायांचा भडीमार चालूच होता. त्यामुळे सावित्रीच्या प्रकृतीत थोडा-फार फरक पडत असल्याचे सर्वांच्या लक्षात आले.

सकाळी सकाळीच सावित्रीला ताजेतवाने वाटू लागले. तिने वेणी फणी केली. पावडर कुंकू लावले आणि हॉस्पिटलच्या व्हरांड्यात ती बसली. सत्यवानाने तिच्या आवडत्या गाण्याची आठवण करून दिली. सावित्रीने ती दबलेल्या आवाजात म्हणून टाकली. तिच्या आवाजातला गोडवा सत्यवानाने कानात भरून ठेवला. आज न्याहारीही हसत खेळत झाली. पण दुपारी पुन्हा गर्भगळीतपणा शिरला. अंगातले त्राण नाहीसे झाल्याने सावित्री बिछान्यावर पडली. क्षणार्धात तिला झोपेने घेरले. दुपारच्या जेवणाची वेळ टळून गेली. सावित्री उठली नाही. म्हणून सत्यवानही जेवला नाही.

बरोबर चार वाजता सावित्रीला जाग आली. चहा बिस्कीटांची वेळ होती. सत्यवानाला कडाडून भूक लागली होती. पण सावित्रीने आताचा चहाही नाकारला

म्हणून तो देखील चहाविना राहिला. ''तू चहा का घेत नाहीस?'' अग तुला नको तर मला तरी कशाला हवा? सत्यवान उत्तरला. सावित्रीने यावर क्षीण हास्य केले आणि तोंड दुसरीकडे फिरवून डोळ्यातील अश्रू पुसले.

दिवसामागून दिवस, महिन्यामागून महिने गुजरले. गेल्या वर्षी वट पौर्णिमेला सुरू झालेला आजार दहा महिने होऊनही संपत नव्हता. यातून बरे होण्याचे चिन्ह नव्हते. सत्यवान सावित्रीची सेवा करायला कधी डोके दाबणे तर कधी पाय चेपणे असेहे प्रकार पाहून काही स्त्रिया अचंबित व्हायच्या तर काही कुत्सित नजरेने पहायच्या. बायकोची नवऱ्याने केलेली सेवा म्हणजे अधर्म असे काहींना वाटायचे पण सत्यवानाला याबाबत अधिकाधिक समाधान व्हायचे. सावित्री आपली थोड्या दिवसांची सोबती आहे, हे सत्यवान जाणून होता.

''काय हो, तुम्ही बायकोची इतकी सेवा करता? लाज नाही वाटत?'' या प्रश्नाला दिलेले समर्पक उत्तर ऐकून सावित्री भलतीच सुखावली होती ''जिने माझ्या आजारपणात मला देव मानून सेवा केली तिची मी देवी मानुन शुश्रूषा करायला नको का?'' सात पावले संगतीने चाललो, त्याचवेळी ठरून गेलेले असते की एकमेकांची शरीरे, मने, दुःखे अगदी एकरुपतेनेच सोसायची असतात नाही का? ''मी देवाकडे अशी प्रार्थना करतोय की यमराज सावित्रीचे प्राण न्यायला आला तर त्याला परतवण्याचे सामर्थ्य मला दे. आमचा जोडा पुराणकालीन सत्यवान सावित्रीसारखा अजरामर व्हायला हवा. जनमानसात नाण्याच्या दुसऱ्या बाजूचीही प्रतिमा आदर्शवत रित्या टिकून रहायला हवी'' हे आदर्शाबद्दलचे अनोखे विचार ऐकता ऐकताच सावित्रीला हृदयाचा जोरदार झटका आला आणि तिच्या कुडीतून प्राण केव्हा निघून गेला हे सत्यवानालाही कळले नाही.



# २. अगतिक

खासकील वाड्यातील सखूमावशी आज भलतीच खुश होती. तिच्या मुलाला पारितोषिक मिळाले होते. साधे सुधे नव्हे तर एम्. टेक परिक्षेत विशेष श्रेणी मिळाल्याचे ते बक्षीस होते. वाड्यात गावात, तालुक्यात व जिल्ह्यात अशा चढत्या पायरीने कौतुक समारंभ पार पाडले जात होते. आई वडिलही त्या समारंभात मोठ्या दिमाखात सामील होते.

कुलभूषण आज भलताच खुशीत होता. त्याच्या चेहऱ्यावर ओसंडून वाहाणारा आनंद टिपण्यासारखा होता. काळ्यासावळ्या कुलभूषणच्या मुखावरचे तेज आज अनोखे वाटत होते.

''शेणातील किडे शेणातच रहात नाहीत'' त्याची आजी उच्चारत असलेली म्हण आज त्याला आठवली. म्हणीच्या भाषेतील गांवढळपणा असला तरी अर्थ मात्र चांगला होता. आज त्याला त्याचा प्रत्यय आला होता.

एका भटा - भिक्षुकाच्या घरात बालकाचा जन्म म्हणजे दुष्काळात तेरावा महिना ! कुटुंब नियोजनाचा आराखडा त्यावेळी कोणी काढला नव्हता. देवाचं देणं या सदराखाली होऊ घातलेले मूल -पुढे तरीव काढणार या भविष्यावर विश्वास ठेवून वाढवायचं, भले त्याची अन्न - पाण्याची आबाळ झाली तरी !

कुलभूषणच्या वेळी आईच्या जीवाला धोका होता. कोणाकडून उसनवार पैसे घेऊन तिला हॉस्पिटलमध्ये ठेवले होते. अशा उसनवारीच्या पैशांवर वारसा तरी कसा करणार?

कुलभूषण दिसामाजी वाढत होता. त्याच्या अलौकिक बुध्दीमत्तेची प्रचिती क्षणाक्षणाला येत होती. स्वामी विवेकानंदा प्रमाणे राष्ट्रप्रेम त्याच्या अंगी असेल. देशोध्दारासाठी तो कार्यरत राहील याची खात्री त्याच्या वडिलाना वाटायची. कुलभूषण कुळा पुरताच मर्यादित न रहाता देशभूषण होईल ही त्यांची मनोमनीची इच्छा होती. ही इच्छा त्यांनी शेजारी-पाजारी, सगे-सोयरे तसेच मित्र परिवाराकडे

व्यक्त केली होती. आपण दरिद्री नारायणाचे पुजारी असल्याची खंतही त्याच्या बोलण्यातून व्यक्त होई. अशा ही परिस्थितीत हा मुलगा नांव काढणार हा त्यांचा आशावाद आज फळाला आला होता.

कुलभूषण सहित सहा मुले त्या घरात नांदत होती. त्यात दोन मुली व चार मुलगे अशी ''सहा'' ही गोळाबेरीज होती. कुलभूषण हे शेंडेफळ. शरीराने तसा अशक्तच त्यात खाण्यापिण्याची आबाळ त्यामुळे शरीर कधी तगडे बनले नाही. पण बुध्दीमत्ता विलक्षण. त्याचे घराणे हुशार म्हणूनच नावाजलेले ! त्याच्या वाडवडिलांनी बुध्दी कौशल्याचा वापर करून बांधिलेला वाडा कौतुकाचा विषय होता. त्यांनी काढलेले कर्ज त्यांच्या हयातीत फिटले नव्हते. ते कुलभूषणच्या वडिलानी कसे वसे दिवस रेटून फिटवले होते.

कुलभूषण शाळेत जाऊ लागला. स्मरणशक्ति दांडगी असल्याने त्याच्या कविता क्षणात पाठ होत. पाढे पाठांतरासाठी वेगळा वेळ काढावा लागला नाही पण एवढ्यावरच ती बात सिमित राहिली नाही. पुस्तक मुखोद्‌गत असण्यासारख्या अजब कथा कुलभूषणच्याच ठायी आढळत होती. त्याच्या काकाना याबाबत खूप कौतुक वाटे. गावात पोट भरत नसल्याने त्याचे काका मुंबईला गेले होते. त्याना एका मंदिरात पूजा करण्याचे काम मिळाले. तिथेच त्यांची झोपण्या-उठण्याची सोय झाली. जेवण एका ब्राह्मणाकडे! हा व्यवसाय सांभाळून मिळालेल्या पैशांची ते विभागणी करीत. काही भाग गांवी असलेल्या भावाच्या संसारासाठी तर काही रक्कम जागेच्या व्यवस्थेसाठी त्यानी शिल्लक ठेवली आणि लवकरच गिरगांव भागात खोली घेतली.

आता भावाच्या मुलाना आणणे सोपे झाले होते. असामान्य बुध्दीच्या कुलभूपणला त्यानी ठेवून घेतले. पण हळू हळू काकाचा मूळ स्वभाव वर येऊ लागला. तो दूर होता तेव्हा काकाना भलतेच कौतुक होते कुलभूषणचे ! पण आता सहवासात त्याला ओहोटी लागली होती. स्वयंपाकांचेच नव्हे तर भांडी कपडे इत्यादी कामेही कुलभूपणच करे. एवढे करूनही त्याच्या अभ्यासात खंड पडला नाही. बुध्दीमत्तेचे कोंब वाढतच गेले. शाळेतील एक गुरूजी मात्र त्याची आस्थेने

चौकशी करीत. योग्य मार्गदर्शन करीत. प्रसंगी वह्या, पेन पुरवीत यामुळे कुलभूषणची झेप वाढतच गेली.

आणि एक दिवस भात करपला म्हणून काका ओरडले. कुलभूषणचा बिछाना त्याने बाहेर फेकला. आणि "चालता हो" अशा शब्दात त्याला सुनावले. त्या दिवसापासून कुलभूषण भलताच बेचैन होता. आपल्या वर्गमित्राला त्याने कहाणी सांगितली. वर्गमित्राने तोडगा काढू असे आश्वासन दिले. दिवस गुजरत होते. कुलभूषणने संधी साधून कपडे भरले आणि काकांच्या घरून पोबारा केला. जाताना चिट्ठी लिहीली, "मी वर्गमित्राकडे जात आहे" काकांनाही फारसे सोयर सुतक नव्हते. त्यांनी चार दिवसानंतर तार ठोकून कुलभूषण गेल्याचे भावाला सांगितले.

कपिल कुलभूषणचा मित्र नव्हे अगदी सख्या भावाप्रमाणे होता. फुटपाथवर झोपायचे. हॉटेलात एक वेळ जेवायचे. दिवसभर फिरत्या विक्रेत्याचे काम बजावयाचे व रात्री अभ्यास करायचा असा दिनक्रम त्यांनी आखला आणि एक दिवस असा उजाडला की त्यांनी आपली व्यथा स्वरूपी कथा सर्व मित्राना सांगितली. दुष्काळात तेरावा महिना आला तरी आपण गुजरतोच ना? तसा विचार करून सोबत्याला जागा द्यायची. त्या दोघांनी ठरवले. कूस वळवण्यापुरती अंथरूणाची रचना होत असे. अंथरुणे काढून झाल्यावर इतर कामे व्हायची. पुस्तके बॅगा ओट्याखाली तर बाकीचे सामान रिकाम्या जागेत खचाखच कोंबलेले. जेवण्याचे सामान मोजकेच चार तोप, चार पेले, चार डवले व चार ताटे! जेवण बनवण्यासाठी लागणाऱ्या वस्तू एका प्लॅस्टीकच्या टोपलीत. त्यामुळे पसारा कमीच असायचा. अशा परिस्थितीत सर्वजण आनंदाने रहात. एकमेकाच्या मायेच्या उबेतला सहवास - - - हर्षदायक भरायचा. काकाचे छळणे नष्ट झाल्यामुळे कुलभूषणच्या अंगावर मूटभर मांस चढले.

एव्हाना आपल्या मित्रांकडे खुर्पात असल्याचे पत्र त्याने आईबाबाना लिहिले. अभ्यासातही त्याचे पूर्वीपेक्षा लक्ष लागू लागले. त्याचा परिणाम म्हणून कुलभूषण १०वीत विशेष श्रेणीत पास झाला. विज्ञान शाखेत प्रवेश घेऊन त्याने जी भरारी

मारली ती विशेषच होती. १२वी ला पदार्थ विज्ञान, रसायन शास्त्र व गणित यात त्याने ९२% गुण मिळवले आणि मॅकानिकल इंजिनियरींगला प्रवेश घेतला. यशाची चढती कमान त्याला लाभत गेली. आय. आय. टी., कानपूर मधून एम्. टेक होण्याचे स्वप्नही पुरे झाले.

आज अनेक नोकऱ्या कुलभूपणला खुणावत होत्या. एका वर्षात नोकरी व जोडधंदा करून त्याने अमाप पैसा मिळवला. त्यातून फार मोठा फ्लॅट विकत घेतला. आपल्या पूर्वीच्या दोस्तानाही त्याने तेथे राहू दिले.

लवकरच तो विवाहबध्द होण्याचा विचार करू लागला. अनुरुप वधूची निवड झाल्यावर निमंत्रणासाठी आई बाबांसहित काकांकडे गेला. मत्सरी काका तिघांवर जाम भडकले. पूर्वीचा सगळा उपकाराचा पाढा त्यानी मोजायला प्रारंभ केला. होय खरे होते ते सगळे ! पण कुलभूषणला दिलेला त्रास मात्र कोणीही व्यक्त करु शकले नाहीत. गरिबीच्या शापामुळे त्यांना काकांच्या उपकाराखाली रहावे लागले. तिघेही काकांच्या रौद्रावरतापुढे गारद झाले. पूर्वायुष्यातील **अगतिकता** अजूनही निपटून निघाली नव्हती.



# ३. गाव करी ते राव न करी

सदाशिव खोतांची अंजनी म्हणजे साऱ्या वाड्यातील लोकांना प्रियतम वाटणारी व्यक्ति ! होतेच तसे तिचे गुण ! अवगुणाला तिळाएवढी जागा तिच्यात नव्हती आणि हेच तिच्या विषयी आवड वाटण्याचे प्रमुख कारण होते.

परोपकारी माणूस बहुधा सर्वांना हवाहवासा वाटतो. साऱ्या वाड्याची दुःखे अंजनीला माहित असायची. कोणाचे आजारपण, कोणाची आर्थिक अडचण, कोणाला मनुष्य बळाची तर कोणाला मुलांकडे लक्ष देण्याची गरज या साऱ्या गोष्टी तिच्या अवधानात व्यवस्थित असायच्या.

काल वसंत उभयताना लग्नाला जायचे होते म्हणून घराच्या परिसराची राखण होणे आवश्यक होते. आज सदूचा पराग आजारी असल्याने हॉस्पिटलला जायचे होते तर उद्या केशवचा जयंत स्कॉलरशिप परिक्षेला जायचा होता. आपला आणि सर्वांची नड भागवली.

अंजनीचे शिक्षण पूर्ण होऊन आज दोन वर्षे झाली होती. आज उद्या करता तिचा विवाह लांबणीवर पडत होता. सदाशिव खोतांची परिस्थिती जेम-तेम होती. अंजनी काम मिळेल तेव्हा कारखान्यात जायची पण फारच थोडे पैसे शिलकीत पडायचे. दुसऱ्यासाठीच त्याचा उपयोग व्हायचा. तिचे बाबा यावावरून तिला विचारायचे पण आपण बँकेत जमा करते असा थोडा फार बहाणा ती करायची. लग्नाच्या वेळी हा ऐवज उपयोगी पडेल असा विचार करून खोत समाधानाचा सुस्कारा सोडायचे.

आज अंजनीचे लग्न ठरवायचे होते. मंडळी बोलणी करण्यास येणार होती. सायंकाळी चार वाजता कार्यक्रमास सुरुवात झाली. देण्या-घेण्याचे व्यवहार बोलताना अंजनीच्या वडिलांचे स्वरूप कळून आले. शारदा नाटकातील कांचन भटाच्या सर्व बाजू सदाशिवरावांच्या अंगात आल्या. मुलगा गर्भश्रीमंत सऊ सऊ गाद्या, गुज गोष्टी करायला भरपूर वेळ - नोकर चाकरांचा गर्दी आणखी काय हवे आहे अंजनीला? सदाशिव रावांचा निश्चय पक्का झाला. आपणालाही चार पैशांची मदत मिळेल आणि आपले अनेक वर्षांचे गाडी खरेदी करण्याचे स्वप्न साकार

होईल. या विचाराने सदाशिवराव सुखावले. त्यांनी मुलाची सखोल चौकशी केली नाही. आपला मुलगा लग्नानंतर सुधारेल ही आई वडिलांची धारणा त्यामुळे लग्न मोठ्या थाटात पार पडले. श्रीमंतीचे दर्शन वाड्यावरच्या लोकाना खूपच भावले.

कितीही विचित्र परिस्थिती असली तरी नववधूचे पहिले काही दिवस मौज-मौजेत जातातच ! परिस्थितीची कल्पना होईपर्यंत आणि त्याचे परिणाम भोगण्याची पाळी येईपर्यंत दिवस आनंदाचे वाटतात.

एक-दोन महिने लोटल्यावर पुढचा काळ जाता जाईना. सरता सरेना. नवरा व्यसनानी परिपूर्ण असा ! तिच्या वाट्याला रात्रीचा सहवास झिंगलेल्या स्थितीतच यायचा. या विचित्र परिस्थितीला तोंड द्यावे लागत असल्याने अंजनीचे शरीरावरचे मांस भराभर कमी होत होते.

अंजनी आज माहेरवाशिण झाली होती. तिला भेटायला वाड्यावरचे बरेच लोक लोटले. पण तिची अंगयष्टी पाहून मनोमन चरकले. बाय बापड्याना अश्रू आवरेनात. आज यासंबंधी सदाशिवरावांकडे विचारणा करायची असे ठरवले. पण अंजनी स्पष्ट बोलेना शेवटी सर्वांच्या आग्रहा खातर तिने तोंड उघडले. सर्व परिस्थिती क्षणार्धात सांगून टाकली. गावकऱ्यांनी याचा जाब विचारण्यासाठी सदाशिवरावाना घेऊन जायचे ठरवले पण ते तयार होईनात तेव्हा सर्वांनी सक्ती करून त्यांना बाहेर काढले.

गावच्या लोकांसोबत सदाशिवरावांचे येणे भुजंगरावाना आवडले नाही. चिरंजीवाचा पत्ता नव्हता. ''आमच्या मुलींची परिस्थिती पाहून आम्ही तुम्हाला विनवीत आहोत की, आपल्या पुत्राने अंजलीपासून घटस्फोट घ्यावा. पण सामोपचाराने मंडळी थोडीच ऐकणार होती? साम, दाम दंड या तिन्हीच काही उपयोग झाला नाही.

शेवटी राहिला भेद! याची अंमलबजावणी करण्यासाठी जेव्हा गांवकरी सरसावले तेव्हा भुजंगरावांची पैशांची गुर्मी पटकन उतरली. गावच्या संघटित शक्तिपुढे त्याना नमावेच लागले.

घटस्फोटाचे सगळे सोपस्कार पूर्ण झाले आणि पुढे लवकरच अंजनीचा विवाह मध्यम स्थितीतल्या पण अंजनीच्या स्वभावाशी जुळणाऱ्या हेमंतशी झाला. अंजनी उभयतां गावच्या अडचणी जमतील तशा सोडवू लागली. जीवनाचे सोने करण्याची संधी त्याना गावकऱ्यामुळे मिळाली म्हणून म्हणतात ना. **''गाव करी ते राव न करी ''.**



# ४. बेवारशी

मुकुंदचा हात धरून त्यांनी वळेवळंच केक कापला. केकचा तुकडा त्याच्या तोंडात घातला. इतरांच्या भावना लक्षात घेऊन त्याने शोकावेग आवरला. छान सुरेल गाणे म्हटले. सुरेल आवाजातील गाणे ऐकून सगळेजण सुखावले. रेडिओवरील डिस्को गाण्याच्या तालात सर्वांनी बराच वेळ नृत्य केले. मुकुंदाही त्यात बेमालूमपणे सामील झाला. आनंदाच्या बेहोशात सर्वांना गाढ झोप लागली. पण मुकुंदाच्या सावरलेल्या मनाने पुन्हा उसळी घेतली. रात्र तळमळतच गेली.

छे! एवढी डिग्री घेऊन नोकरीसाठी वणवण भटकलो. अनेक इंटरव्ह्यू दिले पण कोठेही बोलावणे आले नाही. आयुष्याच्या तारूण्याची सुरूवातच अशी विघडून गेली तर काय करायचे? सांग, आई सांग, माझ्या प्रश्नाचे उत्तर दे. या मुकुंदच्या बोलण्यावर आई सांगणार तरी काय? लोकसंख्येचा चक्रवाढ व्याजाने वाढणारा आकडा, हे त्याचे उत्तर होते. पण या उत्तराने मुकुंदची समस्या सुटणार होती का?

कोणत्याही प्रकारचे काम कमी लेखायचे नाही असा निश्चय करून कामाच्या शोधार्थ निघाला पण मजूर कामासाठी त्याला नकारच मिळाला. कारण शैक्षणिक प्रगती साधताना कष्टाचे काम त्याने कधी केले नव्हते आणि त्या बाबत पुरेसा अनुभव त्याच्याकडे नव्हता. त्यामुळे कामावर रूजू करून घेण्यास कोणीच होकार दिला नाही. शेवटी मनाचा हिय्या करून मुकुंद घराबाहेर पडला. पिंपळ पारावर घोळक्यात सहजपणे तो जाऊन बसला. अनेक दिवसापासुनच्या प्रश्नाचे सार्थ नसले तरी सुस्कारा सोडण्याइतपतचे उत्तर त्याला मिळाले होते. गोव्यात जाऊन चादरी विकण्याचा धंदा करायचा यावर सर्वांचे शिक्का मोर्तब झाले. म्होरक्या म्हणून जयंतची निवड झाली. जयंतने चादरी मागवायच्या व त्याची विभागणी करून इतरांना द्यायचा. जितक्या खपल्या तेवढ्यावरच कमिशन द्यायचे असा क्रम सुरू करण्याचा ठरवला.

घराकडून निघताना मुकुंदची स्थिती अगदी दयनीय झाली होती. आईच्या

प्रेमाला पारखे होण्याचा प्रसंग प्रथमच त्याच्यावर आला होता. आई देखील अत्यंत व्याकुळ झाली होती. पर राज्यात गेल्यावर तिथली माणसं कशी काय वागणूक देतील या चिंतेने ती व्यथित झाली होती. पण आपल्या पदराखाली किती दिवस ठेवणार? सकाळच्या प्रहरी त्याच्या अंगावरची सरकलेली चादर नीट करताना तिला उगीच भडभडून यायचे. पण अशा मायेच्या सावलीत ठेवून चालणार कसे? त्याच्या उदरभरणाचा प्रश्न त्यांने सोडवायला हवा ना? या विचारांच्या भाऊगर्दीने तिच्या जीवाची घालमेल व्हायची ती शब्दातीत होती.

पावसाचा मोसम संपल्यामुळे उघड्या माळरानावर तंबू ठोकून रहाणे शक्य होते. दिवसभर विक्री करायची आणि रात्री निवाऱ्याला तंबूत परतायचे. इकडच्या तिकडच्या अनुभवाची देवाण घेवाण व्हायची. गमतीदार प्रसंग कमतरतेनेच असत. परप्रातांत बिनधास्त फिरणे हे एक दिव्यच होते. जास्तीत जास्त विक्री ही आनंदाची पर्वणी ठरायची. आई वडिलांवरची अवलंबिता दूर झाली होती, हा यातील प्रमुख फायदा होता. एखादे दिवशी विक्री झाली नाही तरी दोस्त मंडळी सांभाळून न्यायची.

दिवसभराची भटकंती त्यात मिळवलेली अनुभवाची शिदोरी, रात्री झोपताना गप्पा गोष्टींनी वाटून घ्यायची आणि निद्रादेवीच्या स्वधीन व्हायचे. हा नेहमीचा शिरस्ता ! कुत्री अंगावर येणे, दरवाजे बंद करणे हे विषय सदा सर्वदाचे! त्यावर दिलखुलास चर्चा होई. दारात बसवून घेऊन संपूर्ण सेट उलगडायला लावायचा आणि घासाघीस करून किमती अशा खाली उतरवायच्या की विचार करण्याला जागाच ठेवता येत नाही. कुणा एखाद्या घरी उचित किमतीत उचल व्हायची. हल्ली सेलांचे पेव फुटल्याने दारोदारच्या विक्रीतही घट झाली होती. काही समस्या सहज सुटायच्या पण काही संकटे महासंकटे होऊन जायची. वाटेच्या खाणाखूणा लक्षात घेऊन तंबूत परतायचे - निवाऱ्यासाठी !

सध्या तंबूतीत लोक संख्या वाढली होती. बिगर गोमंतकीय या ना त्या निमित्ताने एकत्र आले होते. लहानपणी शाळेत "भारत माझा देश आहे. सारे भारतीय माझे बांधव आहेत" या प्रतिज्ञेची प्रचिती या इथे यायची. हिंदी राष्ट्रभाषेने

वातचीत व्हायची. आम्ही सगळे 'भारतीय' या संकल्पनेने सगळे भारावून जायचे. जाती-पातीचा विषय इथे गौण होता. ''सर्व धर्म समभाव'' इथे जागता रहायचा. राष्ट्रीय एकात्मता सहजपणे जोपासली जायची.

आज सकाळी सकाळीच मुकुंदचा मूडच खराब होता. ते दररोजचे दयनीय जीवन त्याचे अंतःकरण फाटून जायचे. स्वाभिमानी जीवाला कुणाच्या दारात गेल्यावर मिळणारी कुत्र्यासमान वागणूक त्याला असह्य वाटायची. पण स्वावंलवी विचाराचे वारे त्याला तेवढेच सुखावून टाकायचे सकाळच्या प्रहरी आलेली उद्विग्नता टिकून राहिली तर त्याचा परिणाम विक्रीवर होणे स्वाभाविक होते.

आज त्याचा वाढदिवस! मित्रांकडे त्याने यावद्दल ओझरता उल्लेख केला होता. सख्यानी त्याचा वाढदिवस साजरा करायचे ठरवले. तुटुंपुन्या मिळकतीत चंगळवाद पोसणे शक्य नव्हते. मामुली पध्दतीने वाढदिवसाची आठवण ठेवायचा इरादा पार पाडणे इथे शक्य होते. सुदाम्याच्या मूठभर पोह्यानी कान्हा सुखावला तसा मुकुंदाही आनंदेल अशा सर्वांची धारणा होती. पण कसले काय आणि कसले काय? दिवसभर उद्विग्नतेत घालवलेल्या मुकुंदाने रात्रौ अळीमळी गूर्पचिळी सोडली नाही. सर्वांनी सर्वतोपरी त्याला हसवण्याचा प्रयत्न केला पण स्मितहास्यासाठीही त्याचे ओठ विलग झाले नाहीत.

गेल्या वर्षी आईने वाढदिवस साजरा केला होता. उरलेल्या कण्यांची गूळ घालून केलेली खीर - अजूनही चव जीभेवर रेंगाळत होती. त्या खिरीत मायेचा ओलावा होता. आईबाबांच्या प्रेमाच्या रसपूर्णतेमुळे ती खीर आजही त्याच्या डोक्यातून हद्दपार झाली नव्हती. कमालीचा भावनाप्रधान मुकुंदा स्थिर बसून होता. ''अरे, काप केक काप'' या मित्राच्या बोलण्याने भानावर येऊन त्याने केकाकडे पाहिले. मात्र कोंडलेल्या भावनाचा सीमा तुटल्या. त्याला रडू कोसळले. ते कितीतरी वेळ आवरले नाही. भावनेवर तावा असलेले त्याचे सहकारी अचंबित झाले. एका-दोघानाच त्याची जाणीव झाली, जे त्याच्या सम होते.

मुकुंदचा हात धरून त्यांनी बळेबळेच केक कापला. केकचा तुकडाही त्याच्या तोंडात घातला. इतरांच्या भावना लक्षात घेऊन त्याने शोकावेग आवरला. छान

सुरेल गाणे म्हटले. सुरेल आवाजातील गाणे ऐकून सगळेजण सुखावले. रेडिओवरील डिस्को गाण्याच्या तालात सर्वांनी बराच वेळ नृत्य केले. मुकुंदाही त्यात बेमालूमपणे सामील झाला. आनंदाच्या बेहोशात सर्वांना गाढ झोप लागली. पण मुकुंदाच्या सावरलेल्या मनाने पुन्हा उसळी घेतली. रात्र तळमळतच गेली.

दुसऱ्या दिवशी सर्वांनी आपापली गाठोडी "जय श्री राम" च्या घोषात एकदम उचलली. सगळेजण आपल्या रस्त्याने निघून गेले. मुकुंदा मात्र घुटमळतच राहिला. मुकुंदाला जयंतने दमदार आवाज दिला. त्याने मोठ्या कष्टाने प्रस्थान ठेवले.

निराश मनाला तशीच अनुकुलता मिळाली नाही तर मन उदासीने भरून जाते. बाहेर अविरत कोसळण्यास पाऊस ढगांनी झाकळलेले आकाश ही परिस्थिती त्याची उरली सुरली प्रसन्नता नष्ट करण्यास कारणीभूत ठरली. ज्या गांवी जायचे ठरविले होते तेथील बसचा दोन तास पत्ता नाही हे पाहून उरांचच आसपास फेरी मारून यावे म्हणून तो वाड्यावरच्या दोन-चार घरात शिरला. एका घरांजवळच्या पोराने त्याच्यावर दगड मारला. रक्तबंबाळ स्थितीत मुकुंद चालत होता. रक्ताची धार थांबण्याकडे त्याचे लक्ष नव्हते. रक्ताच्या धारेत ओघळणारे अश्रु मिसळत होते.

डोळ्यापुढे अंधारी आली म्हणून मुकुंदने आंब्याच्या झाडाच्या सावलीचा आश्रय घेतला गाठोड्यावरचा दोर त्याने घट्ट आवळून धरला त्या अवस्थेत त्याला झोप लागली. परिणामी गाठोडे कुणीतरी पळवले. झोपेतून जाग आल्यावर त्याला परिस्थितीची जाण आली. काय करावे कोठे जावे या प्रश्नांनी त्याचे डोके सुन्न झाले. आज तंबूत जाण्याचे धैर्य त्याला नव्हते. दिवसभर उपाशी - पोटी अश्रूंची सोबत घेत तो तिथेच पडून राहिला. रात्री अंगात उसने बळ घेऊन तो तंबूत परतला. रिकाम्या हाताचा मुकुंदा पाहून जयंत डाफरला. मुकुंदाच्या मनाची घालमेल ईश्वराशिवाय कोण जाणणार त्या रात्री रक्ताकडे तिरक्या डोळ्यानेही पाहिले नाही.

विमनस्क अवस्थेत मुकुंद बाहेर पडला. किड्यांचे भेसूर आवाज, चंद्राचा पत्ता नसलेले आभाळ त्याच्या सोबतीला होते, त्यात भर पडत होती ती सुसाट

वाऱ्याची ! आत्महत्येचे विचार मनात डोकावले पण आईची आठवण डोक्यात घुसल्याने वाईट कृत्यापासून मन परावृत्त झाले.

अंधुकशा प्रकाशात तो अति शांत जागी येऊन पोचला. तेथील शिलाखंडावर त्याने आसन ठोकले. विचारचक्र उलट सुलट फिरत होते. रात्र संपली. उपारणी आली. दुपार झाली, मुकुंदने वृक्षाच्या सावलीखाली शांत झोप घेतली. पोटात भुकेमुळे जे काय घडत होते ते आईशिवाय कोण आकलन करू शकत होते?

असे ४-५ दिवस निघून गेले. डोळे उघडण्याचे त्राण नाही. मृत्युची चाहूल मुकुंदने अनुभवली. एक दोन दिवस या जगात आपली हजेरी असणार. आईचा विचार करण्यापुरता मेंदू काम देत होता. अश्रू उसासे टाकण्याशिवाय आणखी काय होते त्याच्याकडे?

लवकरच त्याने शेवटचा श्वास घेतला. प्रेताची विल्हेवाट कोल्हा कुत्र्यांनी लावलीच होती. आई-बाप भावंडे असा समृध्द परिवार असूनही मुकुंदला **बेवारशी** मरण आले होते.



# ५. आंब्याची बर्फी

वैशाखात आंब्याचे पीक उदंड आले आणि आंबा खूप स्वस्त झाला. आंब्याचे विविध पदार्थ करून साठविण्याच्या प्रक्रियेला ऊत येणे साहजिक होते. मुरंबा जेली यासारखे पदार्थ त्याचबरोबर पेयासाठीचा आमरस या वस्तूंची रेलचेल झाली. आंब्याच्या वड्या करायचा धंदा काही ठिकाणी सुरू केला गेला.

इंदिरा काकू सहज म्हणून बसण्यासाठी आनंदीबाईकडे गेल्या. आनंदीबाईनी आंब्याच्या दोन वड्या इंदिराकाकूना दिल्या. मुळात गोड पदार्थ खाण्याची आवड असलेल्या इंदिराकाकूना त्या खूपच आवडल्या. त्या कशा करायच्या याचा तपशील आनंदीबाईकडून घेतला व घरी जाऊन वेताचा पालट करून त्या बाजारात गेल्या. चांगले दोन डझन आंबे विकत घेतले आणि हाशहुश्य करीत घरी आल्या.

चुलीवरच बर्फी करायची असा निर्णय घेतल्याने चांगल्या लाकडांच्या शोधार्थ बाहेर पडणे गरजेचे होते. गड्याला घेऊन त्या रानात गेल्या. चांगली वाळलेली कटाकट मोडणारी बारीक लाकडे व त्याचबरोबर मोठमोठाली लाकडे असा संच दोरीने करकचून बांधला. निथळणाऱ्या घामाने ओलेचिंब झालेले शरीर घरात प्रवेश करतानाच त्यानी पुसले.

तपशीलाप्रमाणे सर्व सामानाची जुळवाजुळव झाली. चुलीत जाळ करण्यात आला. आंब्याच्या रसाचे भांडे चुलीवर चढविण्यात आले. कमी ऊंचीचं स्टुल घेऊन त्या त्यावर बसल्या. उजव्या व डाव्या हाताने आलटून पालटून त्यानी रस आटविण्यास प्रारंभ केला. जवळ जवळ अर्धा तास काम चालू होते. पण तपशीलानुसार रसाची प्रक्रिया झाली नव्हती म्हणून इंदिराकाकूनी जाळ मोठा केला. सवयीचा गुणधर्म म्हणून मुलाना वेगवेगळ्या सूचना देण्यासाठी तोंडाचा पट्टा सुरू होता. तांबूस पिवळा रंग आता पालटू लागला. क्षणार्धात त्याने काळा रंग घेतला. इंदिराकाकूंची धांदल उडाली. आता साखर त्यात ओतली. पुन्हा ढवळणे सुरू झाले. आता काळ्या रंगाचा गडदपणा वाढत गेला. तोपाच्या मध्यभागी रसाने घास घेतल्याने काळेकुट्टपणा चढतच राहिला. जाळ तसाच सोडून इंदिराकाकू धावतच

आनंदाबाईच्या घरी आल्या एव्हाना तळाचा घास घेतलेला भाग वृध्दिंगत होत राहिला. घरभर आंब्याचा करपट वास भरल्याने मुले अभ्यास सोडून धावतच स्वयंपाक घरात आली. आईचा तिथे पत्ता नव्हता त्यामुळे तिघांनी शक्कल लढवली.

थोरलीने रस ढवळण्याचा प्रयत्न केला पण त्यातला कोणताच भाग हालेना म्हणून प्रयत्न सोडून दिला. अगदी शेवटची चिमुरडी मोठ्या जोशात ढवळायला गेली, पण बर्फीचा थोडाही भाग हालेना म्हणून मधले महाशय पुढे सरसावले. मुलगा म्हटल्यावर मुलींपेक्षा थोडा धीर जास्त असतोच. सारी शक्ती एकवटून त्याने ढवळायला सुरूवात केली. एवढ्यात तोप कलंडला आणि अर्धा अधिकसा रस चुलीत सांडला. शेजारी उभ्या असलेल्या बहिणींवर थेंब उडाले त्या तशाच किंचाळत धावत असता घरात शिरलेल्या इंदिराकाकू आनंदीबाईना आदळल्या चौघीही जमिनीवर आडव्या झाल्या. मुली धूम पळाल्या पण आनंदीबाई व इंदिराकाकूना एकमेकींच्या आधारानेच उठावे लागले. चिरंजीवाच्या अंगावरही बर्फीचा तुषारांच थेंब पडून बारीक सारीक जखमा झाल्या होत्या पण सांडलेल्या रस जवळ करण्याकडेच त्याचे लक्ष गेल्याने उडलेल्या थेंबाचे भान त्याला नव्हते. त्याने त्या रसात हात घातलां आणि असह्य वेदनांनी एकच ओरडा केला. पडल्यामुळे अनुक्रमे झालेली पाठदुखी इंदिराकाकू व आनंदीताई पार विसरून गेल्या चिरंजीवना डॉक्टरकडे नेणे गरजेचे होते. हात पाण्याच्या धारेखाली धरायचा ही बाब कोणाच्याही लक्षात नव्हती फडक्याने हात पुसला तेव्हा जी घालमेल झाली ती शब्दातीत होती.

डॉक्टरकडे जाण्याची धावपळ झाली. चुलीजवळील पसारा तसाच टाकून निघणे भाग होते. डॉक्टरी उपचारानंतर सारी मंडळी घरी परतली.

एव्हाना इंदिराकाकूचे यजमान घरी पोचले होते. स्वयंपाक घरात चहासाठी म्हणून त्यानी जाणे केले पण चुली भोवतालचा प्रकार पाहून त्यानी मुलीना हाका मारल्या पण लपलेल्या मुली बाहेर आल्या नाहीत. कारण त्यांच्या हजेरीमुळे बाबांचा पारा आणखी चढलाच असता. रस भरून झाला. चुलींवरच्या भांड्याने रंग घेतला होता की त्यामुळे ते तांब्याचे आहे का पितळीचे का हिंडालियमचे याचा उलगडा होणे शक्य नव्हते. आवराआवर करायची सवय नसलेल्या इंदिराकाकूंच्या

यजमानांचा अवतार पहाण्यालायक होता. सगळी मंडळी चिरंजीवाच्या मलमपट्टीच्या हातासह घरात प्रवेशती झाली. झालाप्रकार कथन करण्याची गरज नव्हती. आनंदीकाकू हसतात याचे कारण शोधण्यासाठी बाबासाहेब आरशात डोकावले. आंघोळी शिवाय आता पर्याय नव्हता. आंब्याच्या जाडसर रसाने माखलेले शरीर स्वच्छ करण्यास बराच वेळ लागला. आंब्याचा काळाकुट्ट रस तोपात ठाण मांडून बसला होता.

मोलकरणीला तोपाची स्वच्छता करावयास सांगितले. पाणी ओतून ठेवून सतत चार दिवस तोप स्वच्छ करण्यात गेले पण पूर्णपणे भांड्याचे डाग गेले नाहीत. पुत्राची जखम बरी झाली पण बर्फीच्या खूणा शरीरावर आपले स्थान टिकवून राहिल्या आणि **''आंब्याची बर्फी''** कायमची सर्वांच्या स्मरणात राहिली.



# ६. ऋणी

आज परिमल आणि उचित जेवताना खूप हसत खिदळत होते. निकालाचा दिवस होता. परिमलचा दुसरा व उचितचा पहिला नंबर आला होता. परिमल केवळ एका गुणाने पहिल्या क्रमांकास वंचित झाला होता. त्यातच उचितचा आज वाढदिवस! दरवर्षीपेक्षा वेगळ्या पध्दतीने साजरा करायचा त्यांच्या आईने ठरविले होते. शाळेतल्या मुलांना कमाल व चॉकलेट देणे या नेहमीच्या पध्दतीत बदल केला.

सायंकाळी ५ वाजता झोपड पट्टीतील पंचवीस मुले नीलाक्षीच्या अंगणात जमली. घरासमोरच्या अंगणात बाग होता आणि बागेत सी-सॉ, झोपाळाही होता. ज्याना त्या मिळाल्या नाहीत ती मुले  मनसोक्त हिंडत होती.

नीलाक्षीने परिमल उचितला हाक मारली आणि सर्व मुलाना हिरवळीवर गोलाकार बसवले. पाहिले तर एक / दोन मुले वगळता इतर जण घाणी ने बरबटलेली होती. आंघोळ घालूनच खाऊ द्यायचा असे तिच्या मनाने तिला बजावले. दिवस भराच्या उन्हाने हौदातील पाणी तापले होते. एकेकाला हौदाकडे नेऊन आंघोळ घालण्यात आली. डोळयातील घाण, कानातील मळ या कित्येक दिवसापासून साठलेल्या गलिच्छतेचे प्रदर्शन करणाऱ्या गोष्टी - नीलाक्षीने मन लावून साफ केल्या. या कामी उचित परिमलनेही तिला मदत केली. पण कंटाळत कंटाळतच ! नखे काढली. त्यांचे केस विंचरले. पावडर लावला आणि त्यांना छान छान कपडे घातले. मुले आज वेगळ्याच ढंगाची वाटत होती.

यानंतर नीलाक्षीने सोनेरी संगाच्या बशा लाडू, केक, चकली, सफरचंद व पेढा या वस्तू खचाखच भरल्या मुलांनी त्यावर मनसोक्त ताव मारला. थोडेथोडे खायला मिळाल्याने मुलेही बेहद खुष झाली.

एवढ्यात सर्वजित आले. मुलांना पाहिल्यावर त्यांना आनंद झाला. ''तुझ्या शाळेतील का ही मुले?'' त्यांनी आल्या आल्याच उचितला प्रश्न केला. शाळेतील नव्हे बाबा झोपडपट्टीतील. आंऽऽ ती मुले इतकी स्वच्छ?

बाबा ! हे आईचे काम । तिने हौदातील पाण्याने सर्वांना आंघोळ घातली. इतर कामात आम्ही तिला मदत केली. वा । नीलाक्षी वा । तू नर्सचे काम आज यथार्थतेनेच केले आहेस. या मुलात केलेला नखशिखान्त बदल हा डोळ्यात भरण्याजोगा आहे. झोपडपट्टीतील ही मुले यावर कुणाचाच विश्वास बसणार नाही. तुला शाबासकी देण्यापलिकडे मी काही करू शकत नाही.

आता नीलाक्षीने मुलाना हिरवळीवर बसवले. गाणे शिकवले. नेहरूंचे आवडते - मुलांचे महत्व सांगणारे उपदेशात्मक असे गाणे । "या लाडक्या मुलानो, तुम्ही मला आधार" तद्नंतर सर्वांना वह्या दिल्या आणि सोबत पेन देखील ! सगळ्यानी टाटा-बाय-बाय करून निरोप घेतला.

नीलाक्षी आणि सर्वजितचा संसार अगदी खुलून गेला होता. प्रामाणिकपणे काम करून मिळवलेला पैसा आज त्याना भलतेच समाधान देत होता. बंगला, गाडीचे वैभव त्याना प्राप्त झाले होते.

सर्वजितची घरची परिस्थिती बऱ्यापैकी होती. इंजिनियर होईपर्यंत बाप पैसे देऊ शकला. मग मात्र त्याने नोकरी पत्करली. स्वतःच्या कर्तबगारीवर तो बड्या हुद्यावर पोचला.

नीलाक्षी एक भटा - भिक्षुकाची मुलगी ! सर्वजितच्या घरची एकादशणी केल्यावर तीर्थ घेऊन जाणारी ! नीलाक्षीचे बाबा त्यांचे पुरोहित होते. अन्नाला मोताद असणाऱ्या नीलाक्षीला देवाने मोहकसे रूप दिले होते. नावाप्रमाणेच तिचे डोळे निळसर होते.

तीर्थ घेऊन गेल्यावर सर्वजित तिच्याबरोबर खेळायचा. घरातील माणसे त्याला फटकारायची. अप्रत्यक्षरीत्या ती मनाईच होती.

हायस्कूलकडे जाणारा रस्ता, सर्वजितच्या बंगल्या कडूनच जात होता. नीलाक्षी १४/१५ वर्षांची झाली होती. तिच्या रूपात सौंदर्य आणखी भर टाकीत होते. आता उघडपणे भेट घेणे. सर्वजितला जमत नव्हते. चोरून कुठल्या शा झाडाआडून तो शीळ घाली. नीलाक्षी चमकून पाहू लागल्यावर तो तिचे रूप

डोळ्यात साठवी.

या सर्व प्रकाराचे प्रेमात कधी रूपांतर झाले हे सर्वजितलाही कळले नाही. एक दिवस जरी नीलाक्षी गेटसमोरून गेली नाही तरी तो बेचैन व्हायचा. उच्च शिक्षणासाठी शहराकडे जावे लागल्याने नीलाक्षीचे महिनोन् महिने दर्शन होत नव्हते. पण तिला हृदयस्थ सिंहासनावर बसवल्याने आणखी दुसऱ्या कोणाचा विचार मनात शिवणे शक्य नव्हते.

पदवीधर होऊन सर्वजित आला. त्याला चांगल्या कंपनीत नोकरीही मिळाली. आता लग्नाचे वारे वाहू लागले. फोटो, नक्षत्रे घेऊन मुलीचे बाप सर्वजितच्या घराच्या पायऱ्या चढू लागले. पण सर्वजित कोणालाही होकार देईना.

किती दिवस ठेवायचे जू अूईबापाच्या मानेवर? आज त्याने सोक्ष-मोक्ष लावायचे ठरवले. सर्वजित, आजची मुलगी फारच छान आहे. चांगल्या वैभवशाली घरातली, पदवी मिळवलेली. बघ बाबा, सांग तुझा निर्णय. आज ही गोष्ट निकालातच काढायची. असे सर्वजितने ठरवले. आई मला कोणतीही मुलगी पसंत नाही. निलाक्षीवर माझे !

काय ती निलाक्षी? भिकारडी? अरे, जिला  दोन वेळचे जेवण महाग आहे ती निलाक्षी?''

होय आई! मला तिच्याशी लग्न करायचे आहे. मुलीच्या बापाच्या वैभवाची हांव मला नाही. मी माझ्या हिकमतीवर पैसा मिळवीन आणि निलाक्षीला सोन्याने मढवीन. केवळ रुपासाठी नव्हे तर तिच्यातील सद्‌गुण मला यशोशिखरावर नेतील. या त्याच्या निवडीने घरचे वातावरण गढूळ झाले होते. ते स्वच्छ होईपर्यंत बरेच दिवस लोटले.

शेवटी नीलाक्षी सर्वजितची सम्राज्ञी झाली. तिच्या जवळील ऐश्वर्य पाहून माहेरची मंडळी बेहद खूष झाली. नीलाक्षीच्या मागे चार भाऊ होते. शिकायला हुशार असूनही परिस्थितीमुळे दोघानीही शिक्षण अर्ध्यावरच सोडले होते. नीलाक्षीने मोठ्या जिद्दीने नर्सिंग केले. मिळणाऱ्या स्टायपेंडवर तिला शिक्षण पूर्ण करता आले

. दोन वर्षे काम करून तिने थोडी फार पुंजी जमवली. त्यात लग्नाचा अल्प खर्च निभावला. बहुतेक सर्व खर्च सर्वजितनेच उचलला.

नीलाक्षीच्या लग्नानंतर तिच्या माहेरच्या समस्या अधिक गंभीर झाल्या. तिच्याकडून मिळणारे पैसे बंद होणार या दडपणाखाली नीलाक्षीचे आई-वडील वावरत होते. ती श्रीमंत घरची सून होणार या आनंदापेक्षा आपला आधार गेला याच विवंचनेचा पगडा त्या उभयतांवर होता.

सर्वजितला याची पूर्ण कल्पना होती. नीलाक्षीला त्याने नोकरी सोडावयास लावली. तुझ्या एका अलौकीक बुध्दीमत्तेच्या भावाचा शिक्षणाचा खर्च आम्ही उचलु हे आश्वासन त्याने नीलाक्षीला दिले. तिला हा निर्णय ऐकून गगन ठेंगणे झाले. नवोन्मेष आता नीलाक्षीकडे राहून शिक्षं घेऊ लागला. बारावीच्या परिक्षेत बोर्डात नाव झळकावून त्याने मेडिकलला प्रवेश घेतला. एम्. बी. बी. एस्. नंतर त्याने हृदयरोगाचा अभ्यास केला व विशेषज्ञ म्हणून नांव कमवले.

मन ओतून काम करणाऱ्या नवोन्मेषला यश किर्ती, पैसा याचा लाभ होत गेला. गरिबी विषयी तळमळ त्याच्या मनात घर करून होती.

एकदा एक इसम अगदी विकलांग अवस्थेत अ‍ॅडमिट झाला. मोठमाठ्या डॉक्टरांच्या इलाजाना यश आले नव्हते. पण नवोन्मेषाच्या उपचारांना दाद देऊन हा इसम बरा झाला. घरी जाताना पैशांचे बील चुकते करावे म्हणून तो स्वतः डॉक्टरांच्या केबीनमध्ये गेला. टेबलावरची पाटी वाचली. ''नवोन्मेष दिवाकर पटवर्धन'' - अरे, हा तर माझा भाचा ! मामानी भाच्याला कडकडून मिठी मारली. तोंडातून शब्द बाहेर फुटत नव्हते. डोळ्यातून अश्रू मात्र वहात होते. अश्रूंचा आवेश ओसरल्यावर मामानी सर्व चौकशी केली.

जवळच रहात असलेल्या नीलाक्षीला भेटून जावे म्हणून तो तिच्या घरी गेला. तिचे वैभव पाहून आपण कोण त्या संबंधीची ओळख पटवून दिली ''मामा?'' आज इतक्या वर्षांनी आमची आठवण झाली.

मामानी घडलेला वृत्तांत सांगितला नवोन्मेषचे तोंड भरून कौतुक केले. मामा, आपण आपले नाते इतक्या वर्षांनी सांगितलेत ही सगळी सरस्वतीची व लक्ष्मी यांची कृपा बरं का ! आम्ही सर्व त्या दोन देवतांचे सदैव **ऋणी** आहोत.



# ७. माय मरो नि....

सकाळच्या प्रहरी पेरूच्या झाडावर कावळ्यांने काव काव सुरू केली. त्यामुळे घरातील सर्वांनाच जाग आली. वास्तविक आज रविवार. उशिरापर्यंत झोपायचा आगळा वेगळा आनंद सुर्जीत-मनजीतला लुटता आला नाही. बिछान्यावर पडल्या पडल्याच उगाच आळोखे पिळोखे देणाऱ्या आईला हलवून बळेबळेच उठायला भाग पाडले. आई उठून उभी राहिली. मात्र तेवढ्यात सुर्जीत-मनजीत सुरात सूर मिसळून नाचू लागले - 'मावशी येणार... आज आमची मावशी येणार!' कारे बाबा? सकाळी सकाळीच तुम्हाला फोन आला की काय?

नाही गं ! खिडकीतून बघ कावळा कसा कावतोय ते ! हात्तीच्या ! सगळ्याच गोष्टी या खऱ्या होत नाहीत. किती अंधश्रध्दा जपणार? मागच्या रविवारी असाच गोंधळ घातला होता. पण कुठे आली मावशी? सुधाने एक शेरा मारला आणि ती सकाळच्या कामात गुंग होऊन गेली.

मुले मात्र खिडकीशी रेंगाळत होती. कावळ्याच्या जोडीला पोपट आले. त्यांची 'टिट्याव टिट्याव' सुरु झाली. नेहमी ६.३० वाजता ब्रश करणारी ही जोडगोळी आज साडे आठ वाजले तरी खिडकीच्या गजात डोके खुपसून पक्ष्यांवरेवर बोलण्यात गुंग झाली होती. सुधाने स्वयंपाक घरातूनच नाश्ता घेण्यासाठी मुलांना हाका दिल्या. त्यासरशी ती दोघे बाथरुममध्ये जाऊन ब्रश करू लागली. एवढ्यात चिव चिव चिव चिव' असा बेलचा आवाज ऐकू आला. 'मावशी आली, मावशी आली अशा तालसुरात मुलांनी एकच धमाका उडवला. दार उघडण्याचे भान कोणालाच उरले नाही. पुन्हा बेल दाबली गेली. आणि झटक्यात दरवाजा उघडला गेला. मनजित सुर्जीतचे शब्द सत्यसृष्टीत उतरले होते. दोघांनीही मावशीच्या कमरेला घट्ट पकड दिल्याने तिला दारातून पुढे येता येईना. उंबरठा ओलांडण्यासाठी मावशीने कसावसा पाय उचलला. सर्व घरात आनंदाची कारंजी उसळत होती. बहीण मेहुणी या सगळ्या नात्यांनी उपा प्यारी होती.

मुलांनी मावशीचे एवढे प्रेम का? हे सुधाला परिचितच होते. दुसऱ्याला भूक

तहानेची जाणीव तिला पदोपदी असायची. लाडे लाडेच आंघोळ घालणे, कुशीत घेऊन कुरवाळणे, डोक्यावरून ममतेने हात फिरविणे, फिरायला नेणे या सर्व गोष्टी मावशीही तन्मयतेने करायची. या बावीत अंतःकरणाचा ओलावा पुरेपूर वसत होता. त्यामुळे मावशीच्या सहवासातला दिवस संपूच नये असे सुजीत मनजीतला व्हायचे 'मावशी तू कधी जाणार? या प्रश्नामागचा प्रेमभाव सुधा जाणून असायची तशी उषाही ! उन्हे उतरल्यावर मात्र मावशी जाणार या भावनेने दोघांचा चेहरा अस्तांचलाच्या सूर्यासारखा उदासीन व्हायचा. रवीला पृथ्वी सोडताना व्हायचे तोच प्रकार मावशीला निरोप घेताना सुजीत मनजीतला व्हायचे. 'टाटा, बाय बाय' हे शब्द उच्चारताच येत नसायचे.

दिवस रात्र यांच्या पाठशिवणीने वर्षे कधी संपली हे कळलेच नाही. मनजित कौमार्यावस्थेकडे तर सुजीत शैशवावस्थेत पोहोचला होता. आजपर्यंत सुधाने दोघा मुलांच्या जडणघडणीला खूपच महत्व दिले होते. कठीण प्रसंगी कसे वागायचे याचे ज्ञान त्या त्या वेळी ती मुलांना द्यायची. त्यामुळे मुलांचा मनोविकास यथार्थ झाला होता. शाळेत, घरात, समाजात वावरताना ही मुले छोट्या छोट्या प्रसंगानी नाऊमेद होत नसत. या प्रेमाची किंमत मुलांना आजपर्यंत समजली नव्हती. नेहमी उषाचे ममतेचे पारडे जड असायचे.

अशात सुधाने चाळीशी ओलांडली ! शरीराच्या विविध तक्रारी सुरू झाल्या होत्या. पाय दुखणे हा प्रकार कमालीचा त्रासदायक ठरला. त्या त्या भागाची औषधे घेऊन अवयव दुरुस्त करायचा म्हणेपर्यंत आणखी कोठेतरी वेदनेची जाणीव व्हायची. पं सुधाचें गाऱ्हाण मनोमनीच असायचे.

दिवसेंदिवस खंगत चाललेली सुधा दोन वर्षानंतर तर भयानकतेची मूर्तीच बनली. निरनिराळ्या स्थानिक डॉक्टरांचे उपचार सुरू होते. पण शरीर मात्र कृशवतच होत होते. कुणालाही थांग लागू नये असा एक अनामिक आजार सुधाच्या शरीरात घुसला होता.

राज्यातील नामांकित डॉक्बर पालथे घातल्यानंतर परराज्यातील निष्णात धन्वंतरी शोधणे भाग होते. रक्त तपासणी, तीही वैशिष्ट्य पूर्णरीत्या पुरी होणारी

आशा जागी जाणे भाग होते. एका डॉक्टराचे नाव अनेकांनी सांगितले. त्यांच्याकडे जाण्याचा आवर्जून सल्ला दिला. सल्ल्याचे पालन करण्यात आले. रक्त तपासणी झाली. एका गंभीर रोगाची शिकार बनली होती सुधा ! सुजीतच्या ऑपरेशनच्या वेळी घातलेले रक्त दूषित होते. त्यावेळी गंभीरपणे रक्ताची दखल घेतली जात नव्हती. त्यामुळे रोगग्रस्त असेल असे कुणालाही वाटले नाही. पण सुधाच्या यजमानांना रोगाचे नाव सांगितले गेले. उपचार सुरू झाले. महिन्याकाठी हजारो रूपयांचा चुराडा होत होता. साठवलेल्या चार पैशांची वजाबाकीच होत राहिली. सुरेशरावांचा मलुल चेहरा सुधाला चांगलाच वाचता येत होता. औषधांनी प्रगती होत होती. पण पूर्वीचे बळ नव्हते. सर्दी ताप हे नेहमी साथ करायचे. त्यातून मोकळीक मिळाली की घरकाम सुरू. अशी सुधाची दिनक्रमणा चालू होती. चाणाक्ष सुधाला आपण कोणत्या रोगाने ग्रस्त आहोत हे कळले. दुसऱ्या तपासणीच्या वेळी सुधाने डॉक्टरांना टासून विचारले. 'डॉक्टर खरं सांगा. मला 'एड्स' झाला आहे ना ! डॉक्टरांनीही इतक्या दिवसांची लपवा छपवी मागे घेतली आणि 'होय' असे उत्तर देऊन ते तपासणी कक्षाबाहेर पडले.

प्रतिकार शक्तीची क्षीणता हरघडी जाणवत होती. सर्वव्यापी 'एड्स' ने आता दावा साधायचेच ठरवले होते. औषधोपचारांचा भडिमार-तोही सहन न होणारा. दिवसेंदिवसची अशक्तता वरून लवकर तिकिट येणार याची जाणीव देत होती. श्वासनलिका आणि अन्न नलिका यातील बिघाड-परिणाम म्हणजे अन्न गिळंण्यास सायास श्वास घेण्यास प्रयास असाच व्हायचा. या वास्तवात आपण किती काळ तग धरणार याचा अंदाज सुधाला आला होता. शेजारी पाजारी, सगे सोयरे या सर्वांकडे निरवानिरवीची भाषा सुरू झाली. गेले दोन दिवस तर बोलणे खुणावूनच व्हायचे. ग्लुकोज पाण्याचे दोन थेंब हे अन्न! लवकरच सुधाचा देहरथ यमाच्या दारात पोचला.

सुधाच्या मृत्यूची बातमी कर्णोपकर्णी झाली. आप्त इष्टांची रीघ सुरेशरावांच्या घरी लागली. सर्वजनने रडून रडून आकांत केला होता. सुरेशराव अधून मधून डोळे चोळायचे. काही महिलांचे अश्रू गालावर ओघळत होते तर काहींचे सुरातील रडणे हॉलमध्ये घुमायचे. पण तेथे एक चिमुकला मात्र ढिम्म बसला होता. आईच्या

चेहऱ्याकडे डोळे लावून बसलेली सुजीतची नजर जराही ढळत नव्हती. आई उठेल, बोलेल अशी भाबडी समजूत करून बसलेल्या सुजीतला काय सांगून समजवावे हे कोणाच्याच ध्यानी येत नव्हते. त्याने निदान दोन अश्रू तरी गाळावे असे सर्वांना वाटत होते. पण निश्चल दृष्टित फरक पडला नाही. बहुधा सर्वांचे येणे झाले होते. राहता राहिली होती मावशी. मनजीत सर्वांना एकसारखा प्रश्न विचारीत होता 'मावशी कधी येणार? मावशी कधी येणार?' एवढ्या मंडळीत प्रेमळ मावशीचे स्थान कोणीच घेऊ शकले नाही. मुलांच्या हृदयाच्या एका कप्प्यात आईला तर दुसऱ्या कप्प्यात मावशीला स्थान होते. 'उषा आली' असे कोणीतरी पुटपुटले. सर्वांच्या नजरा ओसरीकडे वळल्या. ओसरी ओलांडून उषा दिवाणखान्यात प्रवेशती झाली आणि थेट सुधाच्या निर्जिव देहाकडे तिने धाव घेतली. सुजीतने मावशीला घट्ट कवटावले आणि हुंदक्यासरशी त्याच्या तोंडून शब्द बाहेर पडले - 'आई!' आज आई मावशीचे दुहेरी स्थान मावशीने घेतले होते. सर्वांनी सुटकेचा श्वास सोडला. सुजीतने वास्तवात प्रवेश केला. हे बघून शेजारची सुफल म्हणाली - म्हणतात ना **'माय मरो नि मावशी जगो!'**.



# ८. "त्रिकूट"

अनेक उपक्रम यशस्वीपणे राबवणारी शाळा म्हणून त्या हायस्कूलचा नाव लौकिक होता. मोठमोठ्या जाणकार लोकांची मुले तिथे गर्दी करायची ४ थी पास झाल्यावर प्रत्येकाची धावपळ असायची तिथे प्रवेश मिळवण्यासाठी !

यंदाच्या वर्षी तर त्यानी उच्चांकच गाठला. कथाकथन पाने ओळखा. कडथान्यापासून सजावट मूर्ती बनवणे इत्यादी अनेक स्पर्धांत. कधी तालुका तर कधी राज्य पातळीवर बक्षीसे मिळायची. नवा जोम, नवा हुरुप घेऊन शिक्षक मंडळी वावरायची. त्यामुळे शाळेचे नांव सिंधुदुर्गाच्या कानाकोपऱ्यात पोचले होते. केवळ स्पर्धानच नव्हे तर शैक्षणिक गुणवत्ताही श्रेष्ठ दर्जाची होती. गुणवत्ता यादी प्रसिध्द व्हायची. त्यावेळी घरघरांत यशाचा तुरा या विद्यालयाच्या डोक्यात खोवला जायचाच. एखादे वर्ष अपवादात्मक ठरायचे.

या स्पर्धांमुळे विद्यालयातील तीन मुलांची दाट मैत्री झाली. बहुतांश स्पर्धात यांचा सहभाग असायचा स्पर्धांत चमकण्यातही अग्रक्रम होता. तिघात मात्र द्वेषाची ठिणगी कधीच पडली नाही. सुरेश, महेश, रमेश या तिघांचा स्नेहभाव पुष्कळशा मुलांना ज्ञात होता. या त्रिकूटापुढे आमचे काय चालणार बेलाचीच पाने रे ती ! अगदी एकरिगत बांधलेली ! बेलाच्या इवल्याशा पानांची उपमा कशाला रे? मोठ्या मनाची ही मुले ! मला तर पळसाच्याच पानासारखी वाटतात. उदार व दिलदार अशी ! "दुसरा कोणी म्हणायचा. तिघांचे शाळेत येणे एकत्र - एकमेकाना हाका मारूनच निघायचे. वाटेत गप्पाना ऊत यायचा. आपल्या भोवती जग आहे याचा त्याना विसर पडायचा. गाडीचे हॉर्न जोरजोरात वाजल्यावर त्यांचे भान जागे व्हायचे. पावसाळ्यात तर साचलेल्या पाण्यावरून गाडी गेली की यांच्यावर शिंतोडे उडायचे. मग कुठे लक्ष कपड्यांवर वळायचे.

एक ना दोन अशा अनेक कथा विद्यालयाला ज्ञात होत्या. मधल्या सुट्टीत शालेय मैदानावर गळ्यात हात टाकून फिरायचे. गप्पा रंगात आल्या की ठरावीक खडकावर बसायचे. मग काय चर्चेची लज्जत वाढतच जायची. खेळात त्याना विशेष

स्वास्थ नसायचे. त्रिकूटातील एखाद्या कोणी आजारी असला तर झालेला बदल सर्वांच्या ध्यानी यायचा.

या विद्यालयाचा एक विशेष उपक्रम दरवर्षी असायचा. तो म्हणजे सहल ! साधी सुधी नव्हे शैक्षणीक सहल ! स्थळाची अगोदर पाहणी करण्यात येत असे आणि त्यावर प्रश्नावली तयार करण्यात येत असे. ती मुलांना पूर्वीच द्यायची. निरीक्षण, कुतुहल ज्ञान या बाकी त्या प्रष्नात सामावलेले असायचे. यंदाचे बालावल येथील लक्ष्मीनारायण मंदिर सहलीसाठी निवडले गेले. कुडाळच्या औद्योगिक वसाहती, पिंगुळी महाराजांचा मठ इत्यादी ठिकाणे पाहून मुलांना लक्ष्मीनारायण मंदिराकडे आणण्यात आले. देवळातील सुबक मूर्तीचे दर्शन घेतल्यावर जवळच्या अग्रशाळेत जेवणासाठी मुलांना बसविण्यात आले. जेवण झाल्यावर सांस्कृतिक कार्यक्रम झाला. यात त्रिकूटाने बरीच धमाल उडवली. विनोदी एकांकिका सादर केली. सर्वांना हसता हसता पुरेवाट झाली. त्यानी सादर केलेले कृतीयुक्त गाणे सगळ्यानाच आवडले.

काळाच्या उदरात काय लपले आहे? कोणता एक विदारक अनुभव आपल्याला मिळायचा आहे? याची कल्पनाही कोणाला नव्हती.

सांस्कृतिक कार्यक्रम संपल्यावर तळ्याच्या निरीक्षणासाठी सर्व मुले तळ्याकाठी आली. तळ्यात सुंदर कमळे फुलली होती. शेवाळ खूप साठल्याने पाणी हिरवेगार दिसत होते. सगळ्यांनी तळ्याभोवतालच्या झाडीचे बारकाईने निरीक्षण केले. सगळे जण शिस्तीचे रांगेत देवळाजवळ परतली.

त्रिकूट मागे राहिल्याचे कोणाच्याही लक्षात आले नाही. सर्व मुले परतल्याचे लक्षात आल्यावर घाईघाईने त्रिकूट निघाले. पण हाय रे दैवा ! एकाचा पाय घसरला आणि तो पाण्यात पडला. पाठोपाठ दोघानीही उडी मारली. प्रेमापोटी हे सगळे घडले. पांच मिनिटांच्या आतच त्रिकूट न परतल्याचे शिक्षकांच्या ध्यानात आले. पोहणाऱ्या शिक्षकानी उडी मारली आणि तिघानाही हॉस्पिटलमध्ये त्वरेने पोचवले. प्रथमोपचारानंतरच्या सगळया बाबी हॉस्पिटलमध्ये पूर्ण केल्या गेल्या.

मुले शुध्दीवर आली. सुरेश मधल्या खाटेवर होता. महेश आणि गणेश सुरेशच्या कॉटवर झेपावले. तिघांनीही एकमेकाना कडकडून मिठी मारली. मृत्युच्या दारातून परत आल्याचा आनंद परमानंदच होता. तिघांनीही फेर धरून गाणे म्हटले. आपण हॉस्पिटलमध्ये आहोत यांचे भान त्याना उरले नाही. सगळा वार्ड हे दृश्य डोळे विस्फारून पहात होता. काहींच्या नयनात ओले होण्याइतपत पाणी आले.



# ९. कृतज्ञता

गंगारामने दारावरची बेल वाजवली. कोणी दार उघडेना म्हणून त्याने आणखी दोनदा बटण दाबला. गंगूबाईनी गॅस बंद केला व त्या दार उघडण्यासाठी आल्या. त्यांची नजर गंगारामच्या कपाळावरच्या जखमेकडे गेली आणि झटकन त्या माघारी वळल्या. तिने का? कोठे? व कसे? यापैकी कोणताही प्रश्न गंगारामला विचारला नाही. गंगाराम घरात शिरला. तिथेच वाकड्यावर आडवा झाला. कण्हत तो वेदना सहन करत होता. पण कोणीच त्याची चौकशी करत नव्हते. त्याचा धाकटा भाऊ चुलीला पाय लावून बसला होता. तोही बाहेर आला नाही. शेजाऱ्याकडे गेलेली त्याची बहीण घरात आली. तिनेही गंगारामजवळ कोणतीही वातचीत केली नाही.

घशाला कोरड पडली म्हणून क्षीण आवाजात त्याने पाणी मागितले. पण कोणीच दाद दिली नाही. होतेच कोण तिथे मागणी ऐकायला? एका तासानंतर आई आली. तिने उप्पीट व चहा टेबलावर ठेवला आणि ती तिथून मागे वळली. कसाबसा गंगाराम उठला, हात थरथरत होते. चहा अंगावर सांडत होता. पण काही घोट तरी त्याने पोटात पोचवले. त्यामुळे थोडी हुशारी आली. पुन्हा जोरजोराने कण्हणे सुरू ! पण कोणीच त्याची दखल घेतली नाही.

श्रोते जन हो, असं कोणतं कारण होते. की त्यामुळे गंगाराम दुर्लक्षित होत होता? आजचा घाव तर त्याच्याविषयी अभिमान वाटावा, असाच होता. पण सगळ्यानी त्याच्या पूर्व इतिहासाची उजळणी केली.

इयत्ता १० वी पर्यंत अत्यंत हुशार, परिस्थितीची जाण असलेला सालस मुलगा म्हणून गंगारामची ख्याती होती. बापाचा आधार संसारला नव्हताच ! आईने काबाड कष्ट करून मुलाना वाढवले होते. त्याचबरोबर लुळ्या पांगळ्या नवऱ्याचीही ती सेवा करी.

गंगारामने अकरावीत प्रवेश घेतला. उच्च माध्यमिक विद्यालयाचे वारे त्याला लागले होते. बहुतेक मुलांजवळ पुरेशी पुस्तके, वह्या, पेने असायची. गंगारामला

मात्र तुटुंपुज्या वस्तूवरच समाधान मानावे लागत असे. पण जिद्दीने त्याने अभ्यास करायचा निश्चय केला. युनिफॉर्म असल्याने कपड्यांवर जास्त खर्च येणार नव्हता. पण वह्यांचे काय करायचे? पुस्तके वाचनालयातून किंवा मित्रांकडून अभ्यास करता येतो. पण बस खर्च कसे-बसे ११वीचे वर्ष गुजरले. १२वी नंतर वेगवेगळया क्षेत्रात प्रवेशण्याचे विविध मार्ग निवडण्याचे वर्ष ! त्या वर्षात जे कमावले जाणार होते. त्यामुळे जिंदगीचा प्रश्न सुटणार होता. अभ्यास एक अभ्यासाचा त्याने ध्यास घेतला. वाचनालयात तो तासन तास घालवू लागला. संदर्भ ग्रंथ चालू लागला. मित्रांच्या घरी बसून अभ्यास करू लागला. त्याचे योग्य फळ त्याला मिळाले. घवघवीत यशाने त्याने वैदयक शिक्षणात प्रवेश घेतला.

सर्वांना आकाश ठेटगणे झाले. पेढे कुठचे? साधी साखर परवडायला हवी ना? तरी आईने दोन किलो साखर घेतली व छोटी छोटी पाकिटे करून लोकांची तोंडे गोड केली.

इथपर्यंत सगळे ठीक झाले हो ! वैद्यकीला प्रवेश भल्या भल्याना मिळत नाही पण या गंगारामला सहजासहजी लाभला. ''आनंदाचे डोही आनंद तरंग'' अशी परिस्थिती असली तरी पैशांचे प्रश्नचिन्ह समोर होतेच इतर सोंगे घेता येतात पण पैशांचे काय? प्रवेश फी करता आईने सग्या सोयऱ्यांकडे. ''भवती भिक्षां देही'' केली. कॉलेजचे पहिले दिवस - आरंभीचे आटवडे थोडे काही महिने सुखाचे गेले. पण प्रश्नाना उत्तर सापडत नव्हते. गर्भश्रीमंत मुले गाडीने यायची. पैसे उडवायची. आपल्यापेक्षा हुशार मुलाला कसे चिरडायचे याचेही भान त्याना असायचे. त्यामुळे गंगाराम सारखा गरीब मुलगा जाळ्यात ओढणे खूपच सोपे होते.

सुरवातीला ही मंडळी त्याला हॉटेलमध्ये घेऊन जाऊ लागली. तरूण वय, भूक न आवरण्याचे ! गंगारामाला त्यांच्या संगतीत बरेच काही खायला मिळत असे. त्यामुळे त्यानंतर होणारी लेक्चरे त्याला सुखावह वाटत. चांडाळ चौकटीचा डाव वेगळाच होता. गंगारामच्या हुशारीला सुरुंग कसा लावायचा. हे पुरते त्याला कळले होते.

थोड्याशा सवूरीने गंगाराम त्यांच्या टोळीत सामील झाला. पैसा माणसाला

काय करायला लावतो याचे उत्तम उदाहरण म्हणचे गंगाराम होय ! आईच्या कष्टांना मर्यादा नव्हती. तरी सुध्दा पैसा अपुरांच पडत होता. टोळीत सामील होऊन आज दोन महिने गुजरले. खाण्यापिण्याच्या चंगळीने शरीरही गोंडस होत चालले होते.

तो त्यांच्या इतर धंद्यात कधी सामील झाला हे त्याच्या लक्षातही आले नाही. मुलींची छेड काढणे, अफू, गांजा, चरस यांची विक्री करणे या बाबीची त्याला चटक लागली. ज्या मुली आपल्या टिंगलीस प्रतिसाद देत नाहीत त्यांचा पाठलाग करणे, त्याना जबर भिती दाखवणे इथपर्यंत सगळे बदल ठीक होते. आईच्या लक्षात काही बाबी येत होत्या. घरी आल्यावर डोळ्याला डोळा न भिडवणे, कसेबसे चार घास पोटात ढकलणे या वर्तन बदलामुळे आई पूर्ण धास्तावली होती. एक दिवस धाडस करून तिने याबद्दल विचारणा केली असता उडवा उडवीची उत्तरे तिला मिळाली.

आणि एक दिवस पेपरच्या पुढच्या पानावरच दरोड्याची बातमी झळकली. त्यात कोण कोण गुंतले होते त्यांची नांवे वाचून गंगारामचे कुटुंब पूर्णतः हादरून गेले. आई तर कोलमडूनच पडली. ज्याच्या आधारावर सोन्याचे दिवस पहायचे होते त्यालाच क्रूर तियतीने आपल्या जाळ्यात ओढले होते.

गंगाराम आता अट्टल गुन्हेगार झाला. दरोडे खोरीचा धंदा त्याला प्रिय वाटू लागला. त्याने कॉलेजला रामराम आणि घरला सलाम केला. आता मात्र त्याची आई उभी रहाणे शक्य नव्हते. एकंदर सगळ्या कुटुंबाची वाताहात झाली. ''खायला काळ धरणीला भार'' अशा अवस्थेत आईबाबा होते. गंगारामाला मात्र त्याची जाणीव उरली नव्हती. नशापान केल्याशिलाय त्याचा दिवस गुजरत नव्हता.

थोड्याच दिवसात गंगारामला धक्का देणारी एक गोष्ट घडली. फार मोठ्या दरोड्यात त्याचे साथीदार सही सलामत सुटले आणि तो पोलिसांच्या ताब्यात सापडला. एका वर्षाच्या तुरूंगवासाची त्याला शिक्षा झाली. ते करागृहातील एक वर्ष त्याला पूर्वाष्याच्या वळणावर घेऊन गेले. अंतर्मनातील सद्‌भाव जागृत झाले. ''आपण कोण होतो आणि काय झालो?'' याचे पूर्ण पणे चिंतन करण्यास वेळ

मिळाल्याचे ते फळ होते. तुरुंगातून सुटून गेल्यावर त्याने आईचे पाय धरले. मिळेल ते काम करून आई-बाबाना औषध केले. लवकरच आईही कामाला लागली. गंगारामने आता पॉलिटेक्नीकला प्रवेश घेतला. दिवसभर काम व रात्री कॉलेज करून त्याने काम्प्युटर इंजिनियरची पदविका घेतली आणि चांगल्या कंपनीत नोकरीलाही लागला.

आज त्याने शहराच्या चौकात एक दृश्य पाहिले. काही तरूण एका मुलीची छेड काढीत होते. मुलगी दाद देईना म्हणून त्यांनी आडवे पाडले. आणि सुरा भोसकण्यासाठी हात वर केला. तो हात गंगारामने पकडून मुलीला वाचवले. झालेल्या चकमकीत गंगाराम जखमी झाला. पण त्याच्या जखमा जवर गुन्हेगारीच्या समजून कोणीच त्याच्याकडे फिरकले नाही. निसर्गाने साथ दिल्याने लवकरच तो बरा झाला. त्याने आपली पूर्ण हकिकत मित्राला सांगितली. मित्राने ती त्याच्या कुटुंबियांना सांगितली. इतक्या दिवसांचा गैरसमज दूर झाल्याने गंगाराम आणि त्याचे कुटुंब वेगळ्या प्रकारच्या अनुभूतीत डुंबून गेले. पुढे लवकरच त्याला लग्नाचा योग जुळून आला. ज्या मुलीला त्याने वाचवले होते ती मुलगीच त्याचाशी विवाहबध्द झाली होती. यासारखा "**कृतज्ञता**" व्यक्त करण्याचा दुसरा कोणताच मार्ग तिला उचित वाटला नाही.



# १०. कोणी बनवली तिला मदांध

प्राजक्ता आज बरीच लवकर उठली. रात्रभरचे अंथरुणावरचे तळमळणे उठण्यामुळे संपुष्टात आले होते. पण मनाची घालमेल थोडीच थांबविता येणार होती? कामात गुंतल्याने विचारचक्र अल्पसे धीमे झाले. चहा नाश्ताचे पदार्थ उजाडण्यापूर्वीच तयार झाले होते. प्रजयने हसत हसत त्याविषयी विचारणा केली. पण प्राजक्ताने मात्र त्या हसण्यात सूर मिसळला नाही.

गेले कित्येक दिवस प्रजयला प्राजक्ताची उदासी जाणवत होती. नव वधू म्हणून जेव्हा तिने घरात प्रवेश केला तेव्हापासून गेल्या पाच वर्षापर्यंत तिच्या वागण्यात फरक नव्हता. धाकटा दीर, जाऊबाई, नणंद, सासू सासरे यांच्या मनासारखे वागण्याचा ती कसोशीने प्रयत्न करत होती.

सासूबाई हायस्कूलमध्ये शिक्षिका होत्या तर जाऊबाईंची मुले लहान होती. त्यामुळे घरातील बहुतांश कामे प्राजक्तालाच करावी लागत. न कुरकुरता न त्रागा करता ती सर्व गोष्टी बिनबोभाट तडीला न्यायची. सासरे निवृत्त झालेले. त्यामुळे घरीच असायचे. ते प्राजक्ताला भाजी निवडणे, तांदुळ वेचणे, बाजारात जाऊन किरकोळ वस्तू आणणे या कामी मदत करीत. तांदुळ वेचताना सासऱ्यांचा व तिचा अनेक विषयांचा संवाद असायचा. कारण ती दोघे समविचारी होती.

प्रजयच्या स्वभावात सत्वगुण प्रकर्षाने नसले तरी प्रविणच्या तुलनेत उजवाच होता. त्यामुळे स्वाभिविकच आईबाबांचा ओढा प्रजय - प्राजक्ताकडेच झुकलेला असायचा.

एके दिवशी घरात सत्यनारायण ठरवला होता. याची कल्पना प्रज्ञाला होती पण त्या दिवशी प्रवीणला सुटी असल्याने समुद्रकिनारी मनसोक्त फिरायचे, पदार्थाची अवीट गोडी अनुभवायची आणि मज्जाच मजा करून परतायचे असा बेत दोघांनी ठरवून टाकला. घरात सत्यनारायण आहे याची कल्पना प्रज्ञाने न दिल्याने प्रविणनेही हो ला हो दिला. एरवी सुर्यवंशी प्रज्ञा आज मात्र लवकर उठल्याचे पासून सर्वांनाच आश्चर्य वाटले. मुलांनी पण सगळ्या गोष्टी नियोजित वेळेपेक्षा दोन तास अगोदर

पार पाडल्या. बॅगा घेऊन सर्वजण दारापाशी आले. तेव्हा सासऱ्यांने प्रज्ञाला जाब विचारला. प्रज्ञा पुरती भडकली. एक दिवस देखील मौजमजा करू देत नाहीत असे कडाडते वाकप्रचार सोडून ती व प्रवीण गुश्यातच निघून गेली.

प्राजक्ताचा दिवस पूर्णपणे कामात गेला. सासू सासऱ्यांच्या मनात तिने केव्हाच घर केले होते. आज त्या घरात तिच्या नावाचा मंगलदीप जळत होता.

हाशहुश्श करीत प्रवीण परिवार सभागृहात प्रवेशला. दिवाणखान्यात सत्यनारायणाकडे जळता कटाक्ष टाकून ती स्वकक्षात गेली. खोलीचे दार आतून लावण्यात जराही विलंब झाला नाही. मुले बाहेरच धिंगाणा घालीत होती. बूटही न काढता पुजेसमोरचा धागडधिंगा आजी आजोबांना सहन झाला नाही. आजोबांनी तोंडाचा मारा सुरु केला तर आजीने हाताचा ! त्यामुळे मुलांनी तार सप्तकातील रडणे सुरू केले. प्रज्ञा धावतच आली सासू सासऱ्यांच्या अंगावर अशी खेकसली की ज्याचे नाव ते ! सासरे मटकन आरामखुर्चीत बसले. पण सासूबाईंना मात्र भलताच चेव चढला. शाब्दिक भांडणे परकोटीला गेली. प्राजक्ता मध्ये येऊन उभी राहिल्याने कलहओसरला पण द्वेषाची आग मस्तकात तेवतच राहिली. सत्यनारायणाच्या आरती उदासी वातावरणात पार पडल्या. दिवसेंदिवस मानसिक ताणाव वाढतच राहिला.

प्राजक्ता मात्र हा गुंता सोडवतच राहिली. घराला शाश्वत सौख्य लाभावे, कौटुंबीक वातावरण आनंदी रहावे यासाठीचा तिचा आटापिटा लक्षात घेण्यासारखा होता. पण आभाळाला पडलेलं ठिगळ शिवता येणं शक्य नसतं. तसाच प्रकार प्राजक्ताच्या घरात घडत होता. तुटलेली मने सांधता सांधता आपला तोल तर जाणार नाही ना? याची धास्ती प्राजक्ताला वाटायची. जबरदस्त तणावाचे ओझे वहात प्राजक्ता वावरत होती.

एकूण साऱ्याच कुटुंबाचा डोलारा कोसळू लागला. कमकुवत मनाची माणसे एकमेकांचे वागणे सहन करू शकत नव्हती. दररोजचे कलह ठरून गेले होते. प्राजक्ताच्या ओटीत मात्र सासू सासऱ्यांचे प्रेम भरले जात होते. प्रज्ञाच्या मनात मात्र प्राजक्ताबद्दल मत्सराचा डोंब उसळला होता. हरघडी जाऊबाईचा पाणउतारा

करण्यात तिला आनंद व्हायचा.

एके दिवशी घराचा परिसर भलताच तंग झाला. प्रज्ञाच्या आवडत्या मांजरीवर प्राजक्ताचा पाय पडला. मांजरी चवताळली. तिने प्राजक्ताच्या पायाचा कडकडून चावा घेतला. प्रज्ञाने प्राजक्ताच्या विव्हळण्याकडे दुर्लक्ष तर केलेच. वरून आपल्या आवडत्या मांजरीला हेतूपुरस्सर मारल्याचा दावा करून प्राजक्तावर मंत्रपुष्प वाहिले. मांजरीवरच्या अलोट प्रेमाने भारलेल्या सासूबाईनींही प्रज्ञाच्या सुरात सूर मिसळला. खऱ्या खोट्याचा मागोवा न घेता आपल्या आवडत्या सुनेवर तोंडसुख घेतले.

गेल्या दोन वर्षांपासून घरात चालणाऱ्या बेबनावाला आळा बसावा म्हणून प्रयत्न करणारी प्राजक्ता दोघींच्या वाक्प्रहाराने कोलमडली. तिचे भावुक मन स्थिर व्हायला बराच वेळ लागला. आज प्रज्ञाला मनातून आनंदाच्या उकळ्या फुटत होत्या. तिने रात्रीचे जेवण मस्त मस्त बनविले. प्राजक्ता सोडून साऱ्यांनी त्या जेवणाचा स्वाद घेतला. स्तुतीसुमनांची माळ प्रज्ञाच्या गळ्यात पडली आणि इथूनच घराच्या अवकळेला सुरूवात झाली.

दुसऱ्या दिवसापासून प्रज्ञाकडेच स्वयंपाक घराचा ताबा आला. प्राजक्ताचे कोमेजलेले मन सावरले पण ते उन्मत बनले. प्रेमळ शब्दांची जागा कडक शब्दांनी घेतली. प्रत्येक वेळी घालून पाडून बोलण्याचा वसा तिने घेतला.

दिवाळी झाल्यावर भाऊबीज आली. प्राजक्ताचा भाऊ आज अनोखी भेट घेऊन तिच्या घरी आला होता. सगळा स्वयंपाक व्यवस्थित केला गेला. पण प्राजक्ताच्या तोंडाची टकळी सुरू होती. तीक्ष्ण शाब्दिक बाण सुटत होते.

प्रभाकर मात्र 'काय झाले आपल्या ताईला? माझ्या प्रेमळ ताईला **कुणी बनवली मदांध?**' या प्रश्नात पुरता गुरफटून गेला.



# ११. राखरांगोळी

जयंतने आज दवाखाना उशीराच उघडला. वाट पाहून पाहून कंटाळलेली. चार / दोन गिऱ्हाईके परतीच्या मार्गाला लागली. दवाखान्याजवळ कोणीच फिरकुणार नाही अशी धारणा करून जयंतने दार बंद केले आणि निघाले बारच्या दिशेने ! हा नेहमीचा शिरस्ता होता. अत्यंत कुशलतेने अशा वेदनारहित दात काढण्याच्या पध्दतीमुळे जयंत लोकप्रियतेच्या कळसावर पोचला होता. पण आज नियतीने पान उलटे केले होते.

सुस्वरुप, सुविद्य पत्नी, अलोट संपत्ति व अष्टपैलू व्यक्तिमत्वाचा मुलगा असा संसार असूनही जयंतची अशी स्थिती का व्हावी? चाणाक्ष पत्नीला व स्वतः जयंतला याचे कारण माहित होते. समोरचा पुष्करचा दवाखाना ही एकमेव खंत जयंतला कुरतडत होती.

अनेक पिढ्यांपासून आपला धंदा चालला आहे. यश व किर्ती या दोन शब्दांवर आपलाच अधिकार आहे अशा गुर्मीत वावरणाऱ्या जयंतचा तोरा हळूहळू उतरायला लागला होता. पुष्करच्या दवाखान्यापुढे गिऱ्हाईकांची लागलेली गर्दी त्याच्या नजरेतून निसटत नव्हती.

अहंकार व मत्सर या दुर्गणाच्या जोडीने जयंतच्या शरीरात प्रवेश केला होता. आपला दंत वैद्यकाचा वारसा शिवाय आपले अतुलनीय प्राविण्य याचा भलताच ताठा जयंतला होता. दवाखान्यात जम बसल्यापासून जेवायलाही त्याला उसंत मिळत नसे. पैशांचा पाऊस धो धो पडतच होता. त्यामुळे सुखाची खरखुरा अनुभूती तो अनुभवत होता. त्याला निद्रादेवीची आराधना करावी लागत नव्हती की पचनासंबंधीचे कोणतेही विकार त्याला सतावत नव्हते. त्यामुळे शारिरीक आणि मानसिक समाधान त्याला लाभत होते. आई-वडिलही मुलाच्या भाग्योदयाचा अनमोल आनंद लुटत होती.

आज जयंतने दवाखान्यात बसून रहायचे ठरवले. जाताना एक इंग्लीश कादंबरीही घेण्यास तो विसरला नाही. पूर्वी रात्रीच्या वेळी वाचन करताना तो त्यात

एवढा डुंबायचा की आजूबाजूचा फापट पसारा त्याच्या लक्षातही येत नसे. वाचता वाचता हातातले पुस्तक गळून पडायचे आणि निद्रादेवीच्या कुशीत खुशाल विसावा घ्यायचा ही त्याची नेहमीची पध्दत ! त्यानुसार आज दवाखान्यातही वाचता वाचता झोप येईल आणि जाग आल्यावर पुन्हा वाचन असा क्रम ठेवता येईल. हा त्याचा विचार अनाठायी कसा होता, त्याचा प्रत्यय त्याला आला. अनेक दिवसांची अंगात वळलेली व्यसनाधीनता केवळ दहा मिनीटांच्या अवधीनंतर पुन्हा डोके वर काढू लागली. वळेवळेच जयंतने स्वतःला सावरले. आळस झटकण्यासाठी तो खिडकीपाशी आला. नेहमी प्रमाणे समोर पाहिले. तर पुष्करच्या दवाखान्यातील भीड त्याला भलतीच अस्वस्थता देऊन गेली. नकळत त्याचे पाय बारकडे वळले. आज डोक्यात भलतीच भन्नाटता आली होती. दररोजच्या नियमांप्रमाणे घेतलेले पेग त्याची तगमग दूर करू शकले नाहीत. आणखी प्रमाण वाढवावे लागले. परिणामी जयंत दवाखान्यापर्यंत न पोचताच वाटेतच कोसळला. चार चौघांनी त्याला गाडीत घालून घरी पोचते केले.

ठराविक वेळानंतर जाग आल्यावर त्याला सर्व परिस्थितीचा अंदाज आला. अंथरुणात पडून राहून त्याने तो दिवस घालवला. बायकोचा जेवणाचा आग्रह त्याने जुमानला नाही. दिवसें दिवस व्यसनाचा अंमल चढतच राहिला.

पुष्करला मात्र नियतीने चांगलाच प्रतिसाद दिला. यशाची चढती सोपाने त्याला शिखरावर घेऊन गेली. पैसा, मान, सन्मान त्याच्याकडे धावूनच आले. त्याचे जीवन समाधानाने भरून गेले. लक्ष्मीच्या वरदहस्तामुळे बंगला, गाडी आली. तशीच रूपवान बायकोही आपसुक चालत आली. सग्यासोयऱ्यांची मानवंदना त्याला लाभू लागली. रुग्णांकडून मिळणारा आदरभाव त्यांच्या प्रांतांत रुंजी घालू लागल्या. पुष्कर सुखासीनतेत डुंबून गेला. एक गरिब शेतकरी घराण्यातील ग्रामीण भागातील मुलगा यशस्वीतेचे मोरपीस मुकुटात खोवून आपले दैनंदिन जीवन आगळ्या वेगळ्या आनंदात व्यतीत करीत होता. मत्सराग्नीने पुर्णपणे वेढल्यामुळे जयंतच्या जीवनाची **राखरांगोळी** झाली.



# १२. परिवर्तन

सदू नेहमीच्या सवयीप्रमाणे पहाटे चांगलाच उठला. दुसऱ्याच्या कुळागारातील सुपारी गोळा करणे हा त्याचा नेहमीचा धंदा ! विजेरीच्या प्रकाशात होता होईल तेवढी सुपारी गोळा करणे आणि संधिप्रकाश पसरू लागला की घरी परतणे ही त्याची रीत बायकोला पुरेपुर ठाऊक होती. आज तर पोतडीभरून सुपारी आली होती.

साऱ्या वाड्याला ही त्याची सवय ज्ञात होती. तिन्हीसांज झाल्यावर लोकांच्या कुळागरात झाडावर चढून सुपारी, नारळ काढण्याचीही कला त्याला अवगत होती. तसा झाडावर चढण्यात त्याच्या इतका पटाईत दुसरा कोणी नव्हता. वाडा गप्प का राहतो? त्याला शिक्षा का करू नये? हा प्रश्न शेजारच्या वाड्याना पडायचा. पण वाडेकर शक्यतो सांभाळून घ्यायचा निर्णय अंमलात आणायचे. एवढ्या-तेवढ्या वरून हमरी - तुमरीवर येणारे वाडेकर लोक नव्हते. जरा शांत चित्ताने विचार करणारे होते.

दिवसें दिवस सदूची ही खोडी वाढतच होती. पूर्वी तो सधन लोकांच्याच कुळागरातील सुपारी न्यायचा पण आज त्याची पावले गरिब-आश्रित अशा इसमांकडे वळली. कुळागरात पडलेली सारी सुपारी त्याने वेचली. जे कुटुंब रोजची सुपारी विकून चहा तांदूळ आणत होते त्या घरावर आाज संक्रात आली होती.

असे सलग आठ दिवस गेले. घरात तांदळाचा कण नव्हता. लक्ष्मी उठली. तिने वाड्याच्या दारोदारी जाऊन आपली कहाणी सांगितली. सुपारी कोणी नेली त्याचे नाव प्रकट करण्याचे धैर्य तिच्यात नव्हते. पण वाड्यातील लोक जाणत होते. चोरीचा प्रकार आठ दिवस होत राहिल्याने लक्ष्मीची केविलवाणी स्थिती लोकांना पहावली नाही. काय करायचे? यासाठी वाड्यावरच्या म्होरक्यांनी बैठक घ्यायची ठरवले. वाड्यावर काही गैरप्रकार घडले की सभा घ्यायची आणि तो विषय सर्वांसमोर मांडून त्यावर तोडगा काढायचा अशी वाड्याची अनेक वर्षां पासूनची पध्दत होती.

वाड्यातील बहुतेक लोकांनी सांप्रदायिक दीक्षा घेतली होती. एकोप्याने भजन, पूजन, चिंतन या गोष्टी चालत. काही घरांचा त्यात सहभाग नसे. सदू तर पूर्णपणे विरोधी बोलणारा होता.

सांप्रदायिक लोकांनी यावर उपाय काढला. त्यांनी सदूला खोलीत डांबून ठेवायचे आणि आळी-पाळीने त्याच्या घरी राहून त्याला सुसंस्कारीत करायचे असा एकमुखी ठराव झाला. त्यासंबंधीचा आराखडाही तयार झाला. या सर्व गोष्टींसाठी लागणारी पराकोटीची. सहनशीलता यावरही चर्चा झाली. सदू कोणकोणते त्रास देणार या संभाव्यतेवरही बहुतेकांनी आपली मते मांडली. मनाची सिध्दता परिपूर्ण झाली.

आणि एके दिवशी दुपारी पंचवीस वाडेकर सदूच्या घरी धडकले. काय प्रकार आहे हे सदूच्या लक्षात आले नाही कारण बिनबोभाट चाललेल्या वागण्यात कोणी आजपर्यंत हस्तक्षेप केला नव्हता. आपण काही चूकीचे करतो आहोत याची जाणीवही त्याला नव्हती. निघृर्ण पणे हत्या करणाऱ्या बऱ्याच गुन्हेगारांच्या मेंदूची जडण घडण अशीच असेत कळले पण वळत नाही. त्यातलीच सदूची तऱ्हा होती.

जवान अशा ७-८ तरुणांनी सदूला घट्ट धरून खोलीत घातले. सदूने जोरजोरात आरडा ओरडा केला. भिंती देखील हादरल्या. मग तो ओवसा बोक्सी रडू लागला. या दोन्ही प्रकारानंतर तो शांत झाला आणि जमिनी वरच झोपेच्या अधीन झाला. एकदा वाडेकर थांबला व बाकीचे आपापल्या घरी गेले. दिवस रात्र आठवडा महिना याचे वेळापत्रक असल्याने कोणी किती वेळ थांबायचे याची रुपरेखा ज्याला त्याला माहित होती.

सायंकाळी ७ वाजता सांप्रदायिक लोकांनी जमून भजन करायचे ठरविले. हा नित्याचाच नेम झाला. सदूची निसटून जाण्याची धडपड चालू होती. पण सांघिक शक्तीपुढे काही चालत नव्हते. हळूहळू आरडा ओरडा कमी होत गेला. वाड्यावरच्या एका असामीने त्याला योग शिकवण्यास प्रारंभ केला. मेंदूला भरपूर प्रमाणात ऑक्सिजन लाभल्याने त्याच्या चित्तवृत्ती कमालीच्या शांत होत गेल्या. चेहऱ्यावरचे तेज दिवसें दिवस वृध्दींगत होत होते.

गेले तीन महिने हा प्रकार चालू होता. आता दार उघडे ठेवले जाऊ लागले. पण सदू बाहेर जाण्याचे नांव घेईना. भजन पूजन यातच तो रंगू लागला. आम्ही त्याला निष्क्रीय केला की काय? असा वाडेकरांना संशय येऊ लागला. यावर सर्वांनी मिळून तोडगा काढला. सदूची बखोटी धरून त्याने वळेवळेच त्याला कुळागरात नेले. कुळागरात इतस्ततः पडलेले केसरी रंगाचे बेंडे पाहून त्यांच्या अंगात उत्साहाचे वारे संचारले. पटापट बेंडे गोळा करून त्याने एक रास तयार केली. घरी जाऊन टोपली आणली. टोपलीभर शेंदरी रंगाचे बेंडे पाहून त्याच्या आनंदाला भरते आले. टोपली त्याने अंगणात ओतली आणि तो पलीकडील आपल्या कुळागरात गेला. तेथून अर्धी टोपली त्याने बेंडे आणले. एव्हाना दुपारचा एक वाजला. देवाची पूजा केली. आरत्या म्हटल्या व ठीक दीड वाजता तो जेवायला बसला. शांतपणे अन्नाचे चर्वण करून तो जेवला. अर्धा तास वामकुक्षी केली आणि कुळागरात गेला. थोडे थोडे करून सगळे कुळागर एकट्यानेच खणायला त्याने निश्चय केला. पंधरा दिवसात त्याचे कुळागर खणून झाले. शेणखत घालण्यासाठी त्याने झाडांना आळी केली नंतर उभयतांनी शेण घातले.

सदूत झालेला बदल प्रकर्षाने जाणवणारा होता. घरची कामे करून परोपकाराची एकही संधी तो सोडीत नसे. कोणाला इस्पितळात पोचवणे, कोणाचे रेशन आणून देणे, कुणाला औषध तर कुणाला दळण अशी त्याची कामे चालूच होती. त्यातून जे समाधान मिळे ते अपूर्वच असे.

अगदी पूर्व प्रभाती उठायचे. स्नान करायचे पूजा अर्चा करायची व कामाला लागायचे. असा त्याने दिनक्रम ठरवून टाकला होता. बायकोलाही थोडी मदत व्हावी म्हणून तो झटू लागला. सायंकाळी मुलांना अभ्यासात वैयक्तीक मार्गदर्शन व नंतर सांघिक प्रार्थना, भोजन असा आखीव कार्यक्रम पार पडू लागला. सात्विक समाधानाने त्यांचे मन भरून जाई व त्यामुळे निद्रेची आराधना त्याना करावी लागत नसे. असा बदल कसा झाला? वाडेकरांच्या प्रयत्नाने हे निर्विवाद सत्य आहे. पण आजवर सुधार गृहातून सुधारण्यासाठी केलेले प्रयत्न १००% सफल ठरतात काय? तेथून बाहेर पडल्यावर मूळ स्वभाव डोके वर काढल्याचे दाखले. थोडे थोडके नाहीत. अशाच प्रकारचा सदूचा बदल आहे का? वाडेकरांना प्रश्न पडायचा.

आज सत्तावीस वर्षे उलटली पण सदूचे वर्तन साधू संतासारखेच राहिले. सदूचे पणजोबा सत्प्रवृतीचे होते. त्यांच्याकडून मिळालेले वारसा गुण व वाडेकरांचे प्रयत्न यामुळे सदुमध्ये महान **परिवर्तन** झाले होते.



# १३. जीत

सहकारी तत्वावर चाललेली सोसायटीची बैठक बरीच दीर्घकाल सुरू राहिली. "विना सहकार नाही उध्दार - सहकार्याने जीवन सुकर होते, करा परस्पराना मदत, देश साधेल प्रगतीपथ" अशा प्रकारे सहकार्याचे महात्म्य एकापुढे एक प्रत्येकजण सांगत होता. वासू चिडला. "चल ग जाऊ घरी! म्हणे सहकार्य करा आपापले काम व्यवस्थित केले तर नाही का देशाचा विकास साधणार? सहकार म्हणे सहकार"

शेवंती सभेतून उठायला तयार नव्हती. कारण तिच्या तत्वानुसारचे बोलणे तिला भलतीच खुशी देत होते. वासूने खुर्ची हालवायला सुरूवात केली म्हणून तिला जरा नाराजीनेच उठावे लागले.

शेवंतीला सामाजिक कामाची आवड होती. सहकार्याने एखादे कार्य खुलते याची जाण असलेली शेवंती आज आनंदाने न्हाऊन निघाली होती. स्कूटरच्या मागच्या सीटवर बसून सभेतील वाक्ये ती आठवत होती. या उलट वासूच्या मनात जळफळाट चालला होता. "सहकार्य, सहकार्य" वासू एवढ्या मोठ्याने बोलला की सारेजण त्याच्याकडे नजर रोखून पाहू लागले. "हळू बोला" काय झाले ते लोकानाही कळेनासे झालं आहे म्हणून ते प्रश्नार्थक मुद्रेने आमच्याकडे पहात आहेत" शेवंती म्हणाली.

घरी कामाचा पसारा पडला होता. मोरीत भांड्यांचा खच पडला होता. जेवण करणे. झाडू मारणे सगळ्या गोष्टी तिलाच करायच्या होत्या. या कामी तिला वासूची मदत मिळणार नव्हती. सारे कसे एकट्यानेच निभवायचे? हा विचार मनात आला आणि मघाशी मनात फुललेले हर्षदायी तरंग नवीन विचारात विरून गेले.

तिने हातपाय धुतले. पदर खावेला आणि चहा केला. पतिराजाना नेऊन दिला - वासूनेही चहा घेतला आणि तो बागेत गेला. पुन्हा नाश्ता करायचा म्हणून घरी आला. चपाती, भाजी खाल्ली पण आपली थाळीही त्याने उचलली नाही. घरात पसाराच पसारा होता. तोही सावरायला त्याने शेवंतीला मदत केली नाही. हल्ली

शारिरीक बळाबरोबर मार्नसिक संतुलन खालावल्याने तिला काही सुचत तव्हते. पण वासू जाणून घ्यायला तयार नव्हता.

त्याचा परिणाम अन्नावर होत होता. भाजी करपलेली असायची तर आमटीत दूप्पट मीठ व्हायचे. वासू मुकाट्याने जेवायचा पण मुले त्रागा करायची. ''असं काय ग करतेस आई?'' मला नको ती भाजी ! पापड दे. बघू भाजून ! मुलांच्या या गदारोळामुळे ती भलतीच गांगरून जायची. मनात उद्भवलेला गोंधळ किती तरी पटीने वाढला. मग भांड्याची पडझड आलीच.

खरं तर शेवंती - वासूची आर्थिक स्थिती बरी होती. काटकसरीने संसार करून वासूने बराच पैसा मिळवला आणि साठवला होता. निरनिराळ्या धंद्यातही त्याने गुंतवणूक केली होती. ऐन तारुण्यात शेवंताची चांगली मदत मिळाल्याने. त्याने बागायतीचे नंदनवन केले होते. पण आज? शेवंतीने पन्नाशी गाठली. मुलगा सून कामावर जात असल्याने सारा घरकामाचा बोजा तिच्यावरच पडे. वासू कामसू होता पण तो घरातील काम करणे त्याच्या आराखड्यात नव्हते. ज्याचे काम त्याने करावे असा त्याचा मंत्र असे.

आलेला दिवस शेवंती रेटीत होती. साऱ्यांच्या आवडी-निवडी सांभाळायला कपडे-लत्ते नीट ठेवायचे, भांडी घासायची यात तिचे दिवसाकाठचे पाच - सहा तास खर्ची पडायचे. खूप दमछाक व्हायची. या दमण्यात आपले छंदही ती विसरून गेली होती.

भरतकाम, शिवणकाम यात तिला उत्तम गती होती. संगीताचा अभ्यासही तिने केला होता. पुस्तकाचे वाचन ती रात्रै उशीरापर्यंत जागून करायची पण या सर्व गोष्टी कालौघात गडप झाल्या होत्या. विसर पडणे हा स्थायी भाव झाल्याने चुलीवर ठेवलेले दूध ओतून जात असे, तर कधी करपट वासाची आमटी सर्वांना खायला लागत असे. पण हे वासू समजून घेत नव्हता.

खरं तर तिला वासूबरोबर बागायतीत काम करायलाही आवडले असते. घरातले काम दोघांनी मिळून करायचे व मग त्या कामाकडे वळायचे असा सहकारातून कामाचा गुंता सोडवणे. तिला आवडले असते. वासूला हे विचार ती ऐकवायची पण वासू आज ५३वाव्या वर्षीही आपला हेका सोडायला तयार नव्हता.

मानसिक आणि शारिरीक दडपण आल्याने परिणाम व्हायचा तोच झाला. शेवंतीच्या दोन्ही पायांवर उकळल्या आमटीचा तोप पडला. आता सकाळी उठून चहा करणेही तिला शक्य नव्हते. औषधोपचार चालू झाले पण आराम पडायला बराच वेळ लागणार होता. निपचित पडून रहाणे हा एकच मार्ग तिच्यापुढे खुला होता. मुलगा-सुनेने कामाच्या ठिकाणी न्याहारी जेवण करायचे ठरवले. आता उरला तो वासू ! कधीही जेवणाकडे ढुंकून न पहाणाऱ्या वासूला स्वयंपाक करणे जमेनासे झाले. भात आमटीचाच निर्णय व्हायचा पण तेही पार पाडताना नकोसे व्हायचे. सकाळची न्याहारी पोहे, खिचडी, उसळ अशीच व्हायची. चपाती, डोसे या जिनसाना फाटा मिळाला. जेवण व्यवस्थित न झाल्याने शेवंताची प्रकृती आणखी खालावली. वासूही दिवसें दिवस शक्ती हीन होत गेला कारण इतक्या वर्षात व्यवस्थित जेवण खाणावर पोसलेले शरीर होते ते ! रात्रौ घरी येताना मुलगा - सुन बाहेरचे पदार्थ आणायची त्यावर निभावले जायचे. ते पदार्थ सात्विकतेच्या अभावाचे असल्याने प्रकृती खंगण्यात त्याचाही हातभार लागायचा.

शेवटी शेवंतीने आपली सारी हकीकत बहिणीला कथन केली. बहिणीने ताई-भावोजींना आपल्या घरी रहाण्याचा आग्रह केला. पण वासूला ते पटले नाही. शेवंती बहिणीकडे गेली. चांगले औषधोपचार व जेवणखाण यामुळे दोन महिन्यात तिच्या प्रकृतीला आराम पडला. वासू मात्र खंगतच गेला. आता इस्पितळाशिवाय दुसरा मार्ग नव्हता. शेवंती घरी आली. वासूच्या दुखण्यात तिने मनोभाव सेवा केली. वासूची तब्येत सुधारली पण धावपळीत तिची प्रकृती पुन्हा खालावली. आता मात्र वासूचे डोळे उघडले होते. सहकार्याने ती उभयतां घरकाम निभावू लागली. आता दोघेही प्रकृतीने ठणठणीत नसली तरी मनाने सांधली गेल्याने दिवस मजेत जात होता.

सहकाराची महती आज वासू आपण होऊन सांगत होता. पटवत होता. काही कुटुंबानी त्याचा हा अनुभव उचलून धरला. शेवंतीच्या तत्वाची **जीत** झाली होती.



# १४. भूषण

सभागृहात खुर्च्या अगदी भरून गेल्या होत्या आणि मोकळ्या जागी लोक उभे होते. आत प्रवेश घेण्यासाठी दारावर अजूनही गर्दी होती. असा कोणता कार्यक्रम होता? दिल्लीला २६ जानेवारीला ज्याप्रमाणे कार्यक्रम होतो. तशाच पध्दतीचा कार्यक्रम आज शाळेत होता. साहस, कलानैपुण्य, सामाजिक क्षेत्र अशा नानाविध क्षेत्रात चमक दाखवणाऱ्या विद्यार्थ्यांना पारितोषिके वितरीत केली जाणार होती. त्यानंतर मनोरंजनाचा कार्यक्रम ! ते ही नामांकित शाळातून निवडलेले ! त्यामुळे भरगच्च गर्दी होणे स्वाभाविक होते.

सतीशकुमार व नितीश कुमार यांचे नाव पुकारले गेले आणि टाळ्यांचा कडकडाट झाला. साऱ्या शहरवासीयाना जी गोष्ट सलत होती ती दूर करण्यासाठी नितीश-सतीश झटले होते. ती गोष्ट म्हणजे कचरा समस्या !

नितीश आणि त्याचे मित्रमंडळ शाळा सुटल्यावर ज्या वाटेवरून जायचे त्या रस्त्यावर चार कचरा पेट्या लागायच्या. नाक मुठीत धरून जाण्याशिवाय गत्यंतर नव्हते. काय होणार या कचऱ्याच्या घाणीने? या घोंघावणाऱ्या माशा, त्यांचे अन्नावर बसणे या गोष्टी पाहून त्याच्या पोटात अन्न जात नसे. अभ्यासात लक्ष लागणेही कठीण होऊन गेले होते. त्या उभय मित्रांचे मन संवेदनाशील असल्याने या बाबींचा त्याना फारच त्रास व्हायचा.

नितीश - सतीशची मैत्री शाळा कॉलेजातच नव्हे तर बहुतांश गोव्याच्या कॉलेज भागात ज्ञात होती. नितीश - सतीश भावापेक्षा राम - लक्ष्मण म्हणूनच लोकांनी संबोधायला सुरूवात केली होती. टिळक आगरकर ज्याप्रमाणे भारताच्या स्वातंत्र्यासाठी काय करता येईल यावर चर्चा करीत त्याप्रमाणे ही जोडीही चर्चा करी. यांचा विषय होता - कचरा समस्या ! घाणीच्या साम्राज्याचा विषय गोंद लावून चिकटवल्याप्रमाणे डोक्यात घट्ट चिकटून बसला होता. त्यावर तोडगा निघाल्या शिवाय दोघानाही चैन पडणार नव्हती.

यंदा नितीश-सतीशचं बारावीचं वर्ष ! अभ्यासाव्यतिरिक्त आणखी काहीही

लक्षात आणायचे नाही हा त्यांचा वर्षारंभीचा संकल्प ! बऱ्या गुणांनी पास व्हायचे आणि आय. टी. क्षेत्रात प्रवेश घ्यायचा, असं दोघांनी ठरवलं होतं. पण हळूहळू हा संकल्प ढासळू पहात होता. कचरा रात्री देखील स्वप्नात दिसायचा. त्या विषयाचे ग्रहण त्याना लागले होते.

संध्याकाळच्या वेळी ते दोघे अभ्यासासाठी जाण्याचा बहाणा करीत पुस्तके आणखी एका मित्राकडे ठेवायची आणि शहराचे सर्वेक्षण करायचे हा त्यांचा दिनक्रम असे. कचऱ्याच्या कुंड्या व त्या व्यतिरिक साचलेल्या घाणीची ठिकाणे यांची  त्यांनी नोंद करण्यास प्रारंभ केला.

शहराचा १/४ भाग झाला तेवढ्यात कसोटी परीक्षा आली. त्याचा तातपुरता अभ्यास करायला हवा होता. निदान पास होणे एवढे तरी ध्येय बाळगायलाच हवे होते. सहज आकलन होणारे हिंदी मराठी यासारखे विषय त्यांनी एका दिवसात वाचून काढले. गणित, रसायन शास्त्र, पदार्थ विज्ञान या विषयाला २/२ दिवस घेतले. परिक्षा चांगली पार पडली. अभ्यासाचा आवाका थोठा असल्याने बऱ्यापैकी गुण मिळाले.

आता उरलेल्या शहराचा फेरफटका ! परिक्षा आटोपताच कामाला सुरूवात झाली. घाणीच्या साम्राज्यात बुडालेला हा भाग इतका किळसवाणा होता की फिरताना नाकातोंडावर फडके बांधून जायचा त्यांनी सराव केला. चारी बाजूला केरच केर आणि मध्ये घरे ! जशी काही बेटेच ! तेथे निसर्ग निर्मित पाणी आणि इथे कचरा ! रोगाला आमंत्रण देणारा ! एका विचित्र रोगाची लागण इथे झाली होती. उलटी, संडास व त्याच बरोबर डोळे लालेलाल होणे आणि अंग थरथरणे या बाबी त्या रोगात अंतर्भूत होत्या. रोग्याच्या अंगावर वावरणाऱ्या माशा कचऱ्यावर, कचऱ्यावरून पुन्हा अन्नावर. या पध्दतीमुळे रोगाचा फैलाव मोठ्या प्रमाणावर झाला. आता रोग्याना सर्वथैव मदत करणे हे काम आले. माणसाना इस्पितळात पोचवणे. इतराना प्रतिबंधात्मक उपाय करणे. यात ते गढून गेले.

अभ्यासाचा बोजवारा झाला. परिणामी तिसरी कसोटी चार विषयात नापास अशीच झाली. प्रगती पुस्तक पाहून दोघांचे आई-बाबा खवळले. एव्हाना त्यांच्या

कानावर सतीश-नितीश कोणते काम करतात हे आले होते. आता शेवटची परिक्षा होईपर्यंत खोलीत टाकून अभ्यासाला लावायचा निर्णय दोघांच्या पालकांनी घेतला. पण लक्ष लागणे कठीण होते. दोन महिन्यांनी परिक्षा झाली. निकालाला अजून बरेच दिवस होते. त्या कालावधीत सगळे काम पूर्ण करणे जरूरीचे होते. निकाल काय तो आधीच त्यांना माहीत होता. निकालानंतर घरी रहाणेही शक्य होणार नाही याची त्याना खात्री होती. त्यावरचा विचार नंतर करायचा होता.

अभ्यासाचे टुमणे संपल्याने ते काही थोडे घरचे काम करून ठरवलेल्या कामासाठी बाहेर पडत. इतर दोस्त खेळण्यात दंग असत. तेव्हा हे दोघे आपल्या कामात मग्न असत. त्यानी रीतसर अहवाल तयार केला. त्या घाणीतून सोने कसे निर्माण करता येईल यासाठी त्यानी पर्यावरण प्रेमी व तज्ञ यांच्या भेटी घेतल्या. सारे शहर स्वच्छतेने न्हाऊन निघाला पाहिजे हा त्यांचा पराकोटीचा ध्यास पाहून लोकांना त्यांच्याबद्दल आत्मीयता वाटू लागली. त्यासाठी त्यानी केलेल्या विचार विनिमयातून कचऱ्याच्या तीन भागान वर्गीकरण करायचे ठरले. ओल्या कचऱ्या पासून नैसर्गिक खत ! प्लॅस्टीक पिशव्या, दूध डेअरी घेते. तशा बागायतदार सोसायटीने, दुकानदारानी घ्यायच्या हा दूसरा पर्याय आणि त्या रस्ता करताना डांबरी करणाच्या वेळी तळाला वापरायच्या जेणेकरून पाण्याचा निचरा होईल हा तिसरा पर्याय ! पिशव्यांचा पुर्नवापर ह्याचा ही त्यात समावेश झाला. आज वर्षभर केलेल्या कामाचे श्रेय त्याला मिळत होते.

एव्हाना नितीश-सतीशची किर्ती गोवाभर पसरली होती. पर्यावरणीय जाण असलेल्या, सामाजिक बांधिलकी जाणणाऱ्या अशा या मुलांचा शाळेय प्रांगणात सत्कार होता.

लवकरच त्याना चांगल्या कंपनीत नोकरीला बोलावले गेले. घरची परिस्थिती नेमतेम असल्याने त्यांनी ती नोकरी धरली. चांगला अभ्यास करून ते वरच्या हुद्द्यावर पोचले. त्यांनी रात्रीच्या कॉलेजात जाऊन पदवी अभ्यास क्रमही पूर्ण केला. आता ते दोघेही त्या शहराचेच नव्हे तर साऱ्या गोव्याचे **भूषण** बनून लाहिले होते.





**सौ. रेखा उपाध्ये**

सामाजिक जाणीव ठेवून जगणे ही माझी अंत:प्रेरणा आहे. त्यासाठी हा कथासंग्रह काढण्याचा माझा मनोदय आहे. पुस्तक विक्रीतून पुरेसा पैसा मिळाला तर वाड्यावर बसथांबा काढण्याचा विचार आहे. पुस्तकाची किंमतही ५० रुपयेच ठेवण्याचे कारणही तेच आहे. मला खात्री आहे की माझ्या या सत्कार्यास आपण हातभार लावाल. तुमच्या स्नेहभरीत मदतीमुळे मी याची दुसरीही आवृत्ती काढीन. आणि यातूनच स्फूर्ती घेऊन आणखी एक कथासंग्रह काढीन.

**सौ. रेखा उपाध्ये**
केरी - फोंडा - गोवा ४०३ ४०१.
फोन : २३४०३४९

